**थिरना**–क्रि. अ. हालती वस्तु स्थिर होणें, निवळणें, तळाशीं जमणें. [होऊं देणें.
**थिराना**–क्रि. अ. स्थिर होणें.–क्रि. स. स्थिर
**थीता**–पु. धैर्य, शांति, स्थैर्य.
**थुक्का फ़ज़ीहत**–स्त्री. तिरस्कार, छी थू, फजिती, भांडण.
**थुड़ी**–स्त्री. छी थू, धिक्कार.
**थुड़ी थुड़ी करना**–धिक्कार करणें.
**थूक**–पु. थुंकी.
**थूकों सत्तू सानना**–थोडयाशा सामुग्रीनें मोठें काम करण्याची इच्छा करणें.
**थूकना**–क्रि. अ. थुंकणें. [लांबट तोंड.
**थूथन**–पु. डुकराप्रमाणें पुढें निघालेलें तोंड,
**थूथरा**–पु. नागाचा फणा, लांब तोंड.
**थून, थूनी**–स्त्री. खांब, टेकू.
**थूल–ला**–वि. स्थल, बेढब. [उंचवटा, ढीग.
**थूवा**–पु. सीमा दाखविणारा खांब, पिंड,
**थूहड, थूहर**–पु. रुईचें झाड, कांडया
**थेईथेई**–वि. थयथय (नाचणें). [निवडुंग.
**थेगली**–स्त्री. ठिगळ.
**थेथर**–वि. थकलेला, शांत.
**थैला**–पु. पोते, पिशवी, खिसा. [पिशवी.
**थैली**–स्त्री. लहान पिशवी, रुपयांनीं भरलेली
**थैलीदार**–पु. खजीन्यांत रुपयांची ने आण करणारा माणूस, खजिनदार.
**थैलीबरदारी**–स्त्री. थैली पोंचविण्याचें काम.
**थोक**–पु. ढीग, समूह, ठोक विक्री.
**थोक करना**–एकत्र करणें. [प्रमाणांत.
**थोड़ा**–वि. थोडा, अल्प, कमी.–अ. अल्प
**थोड़ा ही**–जवळ जवळ नाहीं.
**थोड़ा बहुत**–थोडें बहुत. [भाग.
**थोती**–स्त्री. जनावराच्या तोंडाचा पुढील
**थोथा, थोथी**–वि. रिकामा, निरुपयोगी, पोकळ, बोथट, कुचकामाचा.
**थोप**–पु. पालखीचा दांडा, ठसा.
**थोपड़ी**–स्त्री. थप्पड.
**थोपना**–क्रि. स. थापणें, लादणें, वांचविणें.
**थोबड़ा–रा**–पु. जनावराचें तोंड.
**थोर, थोरा**–वि. थोडें.
**थोरिक**–वि. थोडासा.

## [ द ]

**दंग**–वि. थक्क, विस्मित.–पु. भीति, दंगा, हुल्लड. [उपद्रवी, प्रचंड, भयंकर.
**दंगई**–वि. दंगा धोपा करणारा, उपद्व्यापी,
**दंगल**–पु. कुस्तीचा आखाडा, कुस्तीची शर्यत, जमाव, मोठी गादी, चढाओढ.
**दंगा**–पु. दंगा, उपद्रव, हुल्लड.
**दंड़**–पु. सोटा, दंडवत, दंड (शिक्षा), दंड (व्यायाम), निशाणाची काठी, तराजूची दांडी, चार हाताचें माप, यम, घटका.
**दंडक**–पु. दंडा, काठी, शास्ता, दंडकारण्य.
**दंडना**–क्रि. स. शिक्षा करणें.
**दंडनायक**–पु. सेनापति, राजा, यम.
**दंड़प्रणाम**–पु. दंडवत.
**दंड़वत**–पु. साष्टांग नमस्कार.
**दंडित**–वि. शिक्षा झालेला.
**दंडी**–वि. भांडखोर.–पु. दंड धारण करणारी व्यक्ति, यम, राजा, द्वारपाल, जिनदेव, शंकर, संस्कृताचें एक प्रसिद्ध कवि, दंड व कमंडलु धारण करणारा संन्यासी.
**दँतिया**–स्त्री. लहान दांत.
**दँतुला**–वि. मोठें दांत असलेला.
**दंद**–स्त्री. वाफ, उष्णता.–पु. तटा, गडबड.
**दंदाँ**–पु. दांत.
**दंदाना**–पु. दाते (फणी करवत इत्यादिंचे).

**दंदानेदार**–वि. दातेदार, दाते असलेला.
**दंदाँशिकन**–वि. सडेतोड (उत्तर), दांत [काढणारा.
**दंपति-ती**–पु. नवरा बायको.
**दंपा**–स्त्री. वीज.
**दंभ**–पु. ढोंग, गर्व.
**दंभी**–वि. ढोंगी, अभिमानी, पाखंडी.
**दंभोलि**–पु. वज्र.
**दंवरी**–स्त्री. धान्याची मळणी.
**दंश–स**–पु. दंश, दंतक्षत, दांत, विषारी प्राण्याचा दंश, एक विषारी माशी.
**द**–वि. देणारा (समासांत जसें-धनद) पु.–दांत, पर्वत. –स्त्री. भार्या.
**दई**–पु. दैव, विधाता, प्रारब्ध.
**दईका घाला**–दुर्दैवी.
**दई दई**–अ. अरे देवा रे, अग बाई ग.
**दईमारा**–वि. दैवी आपत्तींत सांपडलेला.
**दक़ियानूस**–पु. एक अत्याचारी अरबी बादशाह.–वि. प्राचीन, फार वृद्ध.
**दक़ियानूस दख्मा**–पु. पारश्याचें प्रेतस्थान.
**दक़ियानूसी**–वि. प्राचीन, फार पुरातन.
**दक़ीक़**–वि. बारीक, नाजूक, कठीण.
**दक़ीक़ा**–पु. युक्ति, उपाय, सूक्ष्म गोष्ट, विपत्ति, क्षण.
**(कोई) दक़ीक़ा बाक़ी न रखना**–सर्व उपाय [करून चुकणें.
**दक्खन**–पु. दक्षिण, दक्षिणेकडील प्रदेश.
**दक्ष**–वि. चतुर, दक्षिण, उजवा, निपुण.–पु. [एक प्रजापति.
**दक्षता**–स्त्री. निपुणता.
**दक्षिण**–वि. उजवा, निपुण, चतुर.–पु. दक्षिण दिशा, प्रदक्षिणा.
**दक्षिणा**–स्त्री. दक्षिण दिशा, दान दिलेल्या वस्तुबरोबर द्यावयाचें धन, भेट दिलेला पैसा.
**दख़ल**–पु. अधिकार, हस्तक्षेप, ढवळाढवळ, [प्रवेश, शिरकाव.
**दख़ल देना**–प्रवेश करणें, पोंचणें.
**दख़लनामा**–पु. अधिकारपत्र.
**दख़लयाबी**–स्त्री. अधिकार किंवा ताबा [मिळविणें.
**दखिनहा**–वि. दक्षिणी.
**दखीना**–पु. दक्षिणचा वारा.
**दख़ील**–वि. अधिकारी, ताबा ठेवणारा.
**दख़ीलकार**–पु. जमीनदाराच्या जमिनीवर कमींत कमी बारा वर्षांचा अधिकार (वहिवाट) असलेला मनुष्य.
**दगड़**–पु. नगारा.
**दगड़ना**–क्रि. स. खऱ्या गोष्टीवर विश्वास न ठेवणें.
**दगदगा**–पु. भय, एका जातीचा कंदील, [संशय.
**दगदगाना**–क्रि. अ. चमकणें.–क्रि. स. चमकविणें.
**दगदगी**–स्त्री. भीति, संशय, कंदील.
**दगधना**–क्रि. अ. जळणें.–क्रि. स. जाळणें, दुःख देणें.
**दगना**–क्रि. अ. सुटणें (बंदूक, तोफ इत्यादि), करपणें, जळून जाणें, डागळलें जाणें, डाग पडणें, प्रख्यात होणें.–क्रि. स. जाळणें, डाग देणें, मोहोर करणें, जखम किंवा फोड औषधानें जाळणें, तोफ डागणें, चिन्ह करणें.
**दगर–रा**–पु. विलंब, उशीर, रस्ता.
**दग़ल–ला**–पु. दगा, कपट, बहाणा, डगला, जाड अंगरखा.
**दग़ल फ़सल**–पु. दगा फटका.
**दगहा**–वि. डाग दिलेला, चरका दिलेला, प्रेताला अग्नि देणारा.
**दग़ा**–स्त्री. दगा, कपट.
**दग़ादार, दग़ाबाज़**–वि. दगाबाज, कपटी.
**दग़ाबाज़ी**–स्त्री. कपट.

**दगैल**–वि. डागलेला, दोष असलेला. –पु. दगाबाज.
**दचकना**–क्रि. अ. ठेंच किंवा धक्का लागणें, दबणें, हिसका बसणें. –क्रि. स. धक्का देणें, दाबणें.
**दचना**–क्रि. अ. पडणें, खालीं येणें.
**दच्छ**–पु. पाहा 'दक्ष'.
**दच्छकुमारी**–स्त्री. दक्षकन्या, सती.
**दच्छिन**–वि. दक्षिण.
**दढ़ियल**–वि. दाढीवाला.
**दतवन,दतुअन**–स्त्री. दांतवण (बाभूळ लिंब इत्यादींचें), तोंड धुणें.
**दतिया**–स्त्री. बारीक दांत.
**दतून, दतौन**–स्त्री. दांतवण.
**दत्त**–वि. वांचवलेला, दान दिलेला. –पु. दान, दत्तात्रय, दत्तक.
**दत्तक**–पु. बारा प्रकारच्या पुत्रांपैकीं एक जो पुत्र नसून पुत्र मानला जातो.
**दत्तचित्त**–वि. एकाग्र.
**दत्ती**–स्त्री. वाङ्‌निश्चय.
**ददरा**–पु. गाळावयाचें वस्त्र.
**ददा**–पु. दादा, आजा.
**ददिया ससुर**–पु. आजे सासरा.
**ददिया सास**–स्त्री. आजे सासू.
**ददिहाल**–पु. आजोबांचें घर, किंवा कुळ, [(वडिलांचे वडील).
**ददोरा**–पु. गांध.
**दध,दधि**–पु. दहीं, वस्त्र, समुद्र.
**दधसार**–पु. लोणी.
**दधिकाँदो**–पु. गोकुळअष्टमीच्या दिवशीं दह्यांत हळद मिसळून एकमेकांचे अंगावर फेकतात तो उत्सव.
**दधिसुत**–पु. कमळ, चंद्र, मोती, विष, लोणी.
**दधीचि**–पु. शुक्राचार्यांचे पुत्र. [करणें.
**दनदनाना**–क्रि. अ. दणाणून सोडणें, आनंद

**दनादन**–अ. दणदण शब्दासहित, ताबडतोब.
**दनुज**–पु. राक्षस, असुर.
**दपट**–स्त्री. धाक, धमकी.
**दपटना**–क्रि. अ. दटावणें, दरडावणें.
**दपु**–पु. अहंकार, घमेंड.
**दपेट**–स्त्री. दटावणी. [उग्रता.
**दफ़**–स्त्री. डफ. -पु. विष, आवेश, क्रोध,
**दफ़अतन्**–अ. अचानक, एकाएकीं.
**दफ़्ती**–स्त्री. पुठ्ठा (पुस्तकाचा), पृष्ठीपत्र.
**दफ़न**–पु. प्रेत पुरण्याची क्रिया.
**दफ़नाना**–क्रि. प्रेत पुरणें, गाडणें.
**दफ़ा**–स्त्री. वेळां, कायद्याचें कलम, खेपा. –वि. तिरस्कृत, दूर केलेला. [भरणें.
**दफ़ा लगाना**–कायद्याचें कलमाखालीं खटला
**दफ़ादार**–पु. फौजेंतील अंमलदार, तुकडीचा [नायक.
**दफ़ीना**–पु. पुरलेलें धन.
**दफ़्तर**–पु. कचेरी, कार्यालय, सविस्तर वृत्तांत, लांबलचक पत्र. [करणारा.
**दफ़्तरी**–पु. बुक बाइंडर, कार्यालयांत काम
**दफ़्तरीखाना**–पु. बुकबाइंडिंग विभाग.
**दबंग**–वि. प्रभावशाली, रुबाबदार.
**दबक**–स्त्री. दबण्याची क्रिया, सुरकुती.
**दबकना**–क्रि. अ. भीतीनें लपणें. –क्रि. स. धातूला चपटी करण्याकरितां ठोकणें.
**दबका**–पु. सोन्याची तार.
**दबगर**–पु. ढाल तयार करणारा, चामड्याचें बुधले बनविणारा.
**दबदबा**–पु. प्रताप, दाब.
**दबना**–क्रि. अ. दबणें, मागें हटणें, लाचार होणें, फिक्कें पडणें, नम्र होणें, [लाजणें.
**दबसट**–पु. दाब, दडपण.
**दबाना**–क्रि. स. दाबणें, मागें हटविणें, दडपण घालणें, दाब आणणें, बळकावणें,

असहाय करणें, गाडणें, दमन करणें.
**दबा मारना**–छळणें.
**दबा होना**–ओढाताण होणें. [करणें.
**दबा लेना, दबा बैठना**–पैसे दाबणें, ताब्यांत
**दबी जबानसे कहना**–स्पष्ट न बोलणें.
**दबे होना**–मिंधा होणें.
**दबे पाँव,दबे पैर**–पाय न वाजवतां.
**दबाव**–पु. दडपण, वजन. [वागणारा.
**दबैल-ला**–वि. अंकित, ताबेदार, नमून
**दबोचना**–क्रि. स. लपविणें, एकदम धरून दाबणें. [दाबणें.
**दबोरना**–क्रि. स. समोर उभे राहूं न देणें,
**दब्बू**–वि. मेंगा, भित्रा.
**दम**–पु. श्वास, पळ (वेळ), शिक्षा, दमन, चिखल, घर, बुद्ध, विष्णु, दाव, प्राण, जीवनशक्ति, व्यक्तित्व, कपट, शस्त्राची
**दम उखड़ना**–श्वास थांबणें. [धार.
**दम घुटना**–श्वास कोंडणें. [दु:ख देणें.
**दम घोंटकर मारना**–गळा दाबून मारणें,
**दम खींचना**–गप्प बसणें, श्वास घेणें.
**दम तोड़ना**–शेवटचा श्वास घेणें.
**दम फूलना**–धापा टाकणें. [करणें.
**दम भरना**–अभिमानपूर्वक एकाद्याची स्तुति
**दम मारना या लेना**–विसांवा घेणें.
**दम खुश्क होना या सूखना**–भीतीनें गांगरल्यामुळें श्वास थांबणें.
**(नाकमें) दम आना**–नाकीं नऊ येणें.
**दम देना**–फसविणें. [उपयोगी होणें.
**(किसीका) दम गनीमत होना**–समाजाला
**दममें दम होना**–जीवांत जीव असणें.
**दमक**–स्त्री. कांति, चमक, तेज.
**दमकना**–क्रि. अ. चकाकणें.
**दमकल**–स्त्री. पंप, गुलाबदाणी, आगीचा बंब, विहिरींतून पाणी काढण्याचा पंप.
**दमकला**–पु. रंग किंवा गुलाबपाणी शिंपण्याचें पिचकारी असलेलें भांडें.
**दमखम**–पु. दृढता, प्राण, तलवारीचें पातें किंवा धार.
**दमचूल्हा**–पु. एक प्रकारची लोखंडी चूल.
**दमझाँसा**–पु. कपट, फसवणूक.
**दमड़ी**–स्त्री. पैशाचा आठवा भाग.
**दमदमा**–पु. थैल्यांतून वाळू भरून रक्षणासाठीं रचलेला कोट, मोरचा, प्रताप.
**दमदार**–वि. मजबूत, तीक्ष्ण धारेचा, भरपूर जीवनशक्ति असलेला.
**दमदिलासा**–पु. टाळण्याकरितां वरवर केलेल्या गोड गोष्टी.
**दमन**–पु. दडपण, नाश, वध, संयम, शिक्षा, विष्णु, शंकर, एक ऋषि, एक राक्षस, दमयंती, सारथी, दवणा, तत्त्वज्ञानी, वीर.–वि. जिंकणारा, सत्ता
**दमना**–क्रि. स. दडपून टाकणें. [स्थापणारा.
**दमबाज़**–वि. फूस देणारा.
**दमा**–पु. दमा (रोग).
**दमाद**–पु. जांवई.
**दमानक**–स्त्री. तोफेची फैर.
**दमामा**–पु. नगारा.
**दमारि**–पु. वणवा, दावानल. [करणारा.
**दमैया**–वि. हरणारा, नाहींसे करणारा, दमन
**दया**–स्त्री. करुणा, दक्षाची एक कन्या.
**दयानत**–स्त्री. सत्यनिष्ठा.
**दयानतदार**–वि. इमानी.
**दयाना**–क्रि. अ. द्रवणें, दयाळू होणें.
**दयार**–पु. प्रांत, देवदाराचें झाड.
**दयालु**–वि. दयाळू, कृपाळू.
**दयावना**–वि. पु. दीन, दयेस पात्र.

**दयिता**–स्त्री. पत्नी.
**दर**–पु. शंख, खळगा, गुहा, भय, समूह, सेना, दरवाजा. –स्त्री. प्रमाण, प्रतिष्ठा, विदारण, भाव, ऊस, पत्ता. –वि. फोडणारा, अल्प. –अ. आंत.
**दर उठना**–विश्वास उडणें.
**दर दर मारा फिरना**–दारोदार लागणें.
**दर असल**–अ. वस्तुत:.
**दर आमद**–स्त्री. आयात (माल),आगमन.
**दरकना**–क्रि. अ. चिरणें.
**दरका**–पु. आघात.
**दरकाना**–क्रि. स. फाडणें. [आवश्यकता.
**दरकार**–वि. क्षिति, आवश्यक. –स्त्री.
**दरकिनार-रा**–अ. एक बाजूला, वेगळें.
**दरकूच**–अ. मजल दर मजल.
**दरख़्त, दरख़्त**–पु. झाड.
**दरख़ास्त**–स्त्री. विनंति, प्रार्थना, अर्ज.
**दरगाह**–स्त्री. दरबार, दरगा (पिराचा),
**दरगुज़र**–वि. वंचित, माफ. [उंबरा.
**दरगोर**–रागानें 'जा मर' म्हणणें.
**दरज**–स्त्री. भेग, चीर, फट.
**दरज करना**–नोंदविणें.
**दरजन**–पु. डझन.
**दरजा**–पु. इयत्ता, हुद्दा, खंड.
**दरज़ी**–पु. शिपी.
**दरद**–पु. पीडा, दु:ख, दया, भीति, विषभेद, पारा, हिंगुळ, शिसें. –स्त्री. भीति, मन, हृदय, पर्वत, कडा, उंचवटा,
**दरदर**–अ. दारोदार. [बाण.
**दरदरा**–वि. खरबरीत.
**दरदराना**–क्रि. स. रवा काढणें.
**दरना**–क्रि. स. भरडणें, नाश करणें.
**दरनापा**–पु. जळफळाट.

**दरप**–पु. घमेंड.
**दरपण**–पु. आरसा.
**दरपना**–क्रि. अ. संतापणें, गर्व करणें.
**दरपनी**–स्त्री. लहान आरसा.
**दर परदा**–अ. गुप्तपणानें, लपून छपून.
**दरपेश**–अ. समोर, पुढें. [शोधांत.
**दरपै**–अ. एकाद्याच्या पाठीमागें, एकाद्याच्या
**(किसीके) दरपै होना**–एकाद्याच्या पाठीस लागणें, एकाद्याला त्रास देणें.
**दरब**–पु. धन, द्रव्य.
**दर बदर**–अ. दारोदार.
**दरबा**–पु. कबूतरखाना, खुराडें.
**दरबान**–पु. पहारेकरी, द्वारपाल.
**दरबानी**–स्त्री. पहारा, पहारेकऱ्याचें काम.
**दरबार**–पु. राजसभा, राजा, महाराज, अमृतसरमधील शिखांचें मंदिर, द्वार.
**दरबारी**–पु. राजसभेचा सभासद, राजदरबारांत बसणारा मनुष्य. –वि. राजसभेंत बसण्यास योग्य.
**दरबी**–स्त्री. पळी, सापाचा फणा.
**दरभ**–पु. दर्भ, वानर.
**दरमा**–पु. बांबूची चटई.
**दरमान**–पु. उपचार, औषध.
**दरमाहा**–पु. मासिक वेतन.
**दरमियान**–पु. मध्य. –अ. मध्यें.
**दरमियानी**–वि. मधला, मध्यस्थ. –पु. समेट घडवून आणणारी व्यक्ति.
**दरवाज़ा**–पु. दरवाजा, कपाट, दाराच्या
**दरवेश**–पु. फकीर, भिकारी. [फळ्या.
**दरवेशाना**–वि. फकीराप्रमाणें.
**दरवेशी**–स्त्री. फकीरी.
**दरश-स**–पु. दर्शन, दृष्टादृष्ट, सौंदर्य.
**दरसन**–पु. दर्शन.

**दरसना**–क्रि. अ. दिसणें. –क्रि. स. पाहणें.
**दरश(स)नी**–स्त्री. आरसा.
**दरसाना**–क्रि. स. दर्शविणें, दाखविणें.
**दर हक़ीक़त**–अ. खरें पाहिलें असतां.
**दरहम**–वि. अव्यवस्थित. [पालट.
**दरहम बरहम**–वि. रागावलेला, उलटा-
**दरांती**–स्त्री. विळा.
**दराज़**–वि. विस्तृत, मोठा. –अ. अधिक. –स्त्री. चीर, फट, टेबलाचा खण.
**दरार**–स्त्री. फट, चीर.
**दरारना**–क्रि. अ. भेग पडणें, फट पडणें.
**दरारा**–पु. धक्का.
**दरिंदा**–पु. हिंसक पशु.
**दरिद्र**–वि. दरिद्री, निर्धन.
**दरिद्रता**–स्त्री. गरिबी.
**दरिया**–पु. नदी, समुद्र. [नदीजवळचा.
**दरियाई**–पु. समुद्रासंबंधी, नदीसंबंधी,
**दरियाए शोर**–पु, समुद्र, काळें पाणी.
**दरियादिल**–वि. उदार.
**दरियाफ़्त**–वि. ज्ञात, माहित.
**दरियाबरार**–पु, मळीची जमीन.
**दरियाबुर्द**–पु. नदीच्या प्रवाहानें वाहून गेलेली जमीन.
**दरियाव**–पु. पाहा 'दरिया'.
**दरी**–स्त्री. सतरंजी, दरीखोरें, गुहा.
**दरीख़ाना**–पु. पुष्कळ दरवाजे असलेला महाल, राजदरबार. [ण्याची जागा.
**दरीचा**–पु. खिडकी, खिडकीजवळ बस-
**दरीबा**–वि. फाटलेला.
**दरीबा**–पु. पानाचा बाजार.
**द(दु)रूद**–स्त्री. आशीर्वाद, शुभकामना.
**दरेग़**–पु. दुःख, पश्चात्ताप, कमतरता.
**दरेरना**–क्रि. स. चेंदामेंदा करणें, रगडणें,
**दरेरा**–पु. धक्का, प्रवाहाचा जोर. [वाटणें.
**दरेस**–वि. सिद्ध बनविलेला, छापलेलें. तलम कापड. –पु. वेश.
**दरैया**–पु. दळणारा, नाश करणार.
**दरोग़**–पु. खोटें. [घेऊन खोटें बोलणें.
**दरोग़हलफ़ी**–स्त्री. खरें बोलण्याची शपथ
**दर्ज़**–स्त्री. पाहा 'दरज'.
**दर्जन**–पु. डझन.
**दर्जा**–पु. पाहा 'दरजा'.
**दर्दअंगेज-आमेज-नाक.**–वि. दुःखद.
**दर्द खाना**–दया दाखविणें.
**दर्दमंद, दर्दी**–वि. दुःखी, दयाळू.
**दर्दसरी**–स्त्री. मेहनत, त्रास.
**दर्प**–पु. गर्व, राग, उद्धटपणा, उत्साह, कस्तूरी, एकप्रकारचा मृग, दाब.
**दर्भ**–पु. एक प्रकारचें गवत, कुशासन.
**दर्रा**–पु. दरी.
**दर्राना**–क्रि. अ. बेधडक निघून जाणें.
**दर्शक**–पु. प्रेक्षक, दाखविणारा.
**दर्शन**–पु. पाहा 'दरसन'.
**दर्स**–पु. अभ्यास, उपदेश.
**दल**–पु. पान, दळ, फुलाची पाकळी. तमालपत्र, समूह, फौज, सैन्य, गट, पक्ष.
**दलक**–स्त्री. गोधडी, कप, थांबून थांबून येणारी कळ.
**दलकन**–स्त्री. कंप, थरकांप, आघात.
**दलकना**–क्रि. अ. फाटणें, थरथरणें, चकित होणें, उद्विग्न होणें. –क्रि. स.
**दलदल**–स्त्री. दलदल, चिखल. [भिवविणें.
**दलदला**–वि. दलदलीचा.
**दलना**–क्रि. स. दळणें, वाटणें, चेंदामेंदा करणें, चिरडणें, मळणें, दाबणें, नष्ट
**दलबंदी**–स्त्री. पक्ष, संघटना. [करणें, तोडणें.

**दलबल**–पु. फौजफाटा, सैन्य. [मंडप.
**दलबादल**–पु. मेघ समूह, मोठी फौज, मोठा
**दलमलना**–क्रि. स. मळणें, एकजीव करणें, चिरडणें, नाश करणें.
**दलवाल**–पु. सेनापति.
**दलहन**–पु. द्विदलधान्य, कडधान्य.
**दलहरा**–पु. डाळ विकणारा.
**दलान**–पु. दालन, ओसरी.
**दलाल**–पु. दलाल, मध्यस्थ, माल खरेदी करण्यांत व विकण्यांत मदत करणारा.
**दलाली**–स्त्री. दलालाचें काम, दलालाला मिळणारा पैसा. [नष्ट झालेला.
**दलित**–वि. खंडन केलेला, विदीर्ण, खेचलेला,
**दलिद्दर**–पु. दरिद्री.
**दलिया**–पु. भरडलेलें धान्य, रवा.
**दलील**–स्त्री. युक्तिवाद, वादविवाद.
**दलेल**–स्त्री. कवायतीच्या स्वरूपांत शिपायांना झालेली शिक्षा.
**दव**–पु. दावाग्नि, जंगल, अग्नि, कष्ट.
**दवकैया**–पु. जरीची तार तयार करण्या-साठीं, (सोनें, रुपें ठोकून) पत्रा तयार
**दवन**–पु. नाश, पाडाव. [करणारा.
**दवनी**–स्त्री. धान्याची मळणी.
**दवरिया**–स्त्री. वणवा.
**दवा, दवाई**–स्त्री. औषध, उपचार, इलाज.
**दवाखाना**–पु. औषधालय.
**दवागिन**–स्त्री. दावाग्नि.
**दवात**–स्त्री. दऊत.
**दवामी**–वि. कायम असणारें, स्थायी.
**दवामी बंदोबस्त**–पु. कायमधारापद्धति.
**दवारी**–स्त्री. दावाग्नि.
**दशगुणोत्तर**–पु. दशांश (गणित).
**दशमलव**–पु. दशांश चिन्ह.
**दशमी**–स्त्री. दहावी तिथि, मरणावस्था.
**दशहरा**–पु. दसरा, विजयादशमी.
**दशाह**–पु. मृतकाचा दहावा दिवस.
**दश्त**–पु. जंगल.
**दस**–वि. दहा, कित्येक. –पु. दहाची संख्या.
**दसन**–पु. दांत, कवच.
**दसना**–क्रि. अ. पसरणें. –क्रि. स. अंथरून घालणें. –पु. बिछाना.
**दसमाथ**–पु. दहा शिरें असलेला रावण.
**दसरथ**–पु. दशरथ राजा.
**दससीस**–पु. रावण.–वि. दहाशिरें असलेला.
**दसा**–स्त्री. दशा, वैश्यांचा एक प्रकार.
**दसानन**–पु. रावण.
**दसी**–स्त्री. वस्त्राचा शेवटचा भाग, कापडाचें ठाण.
**दस्तंदाज़ी**–स्त्री. हस्तक्षेप, ढवळाढवळ.
**दस्त**–पु. जुलाब, रेच, हात.
**दस्तक**–स्त्री. खडखडाट, महसूल वसूल करण्याचा परवाना, कर, माल घेऊन
**दस्तकार**–पु. कारागीर. [जाण्याचा परवाना.
**दस्तकारी**–स्त्री. कारागिरी.
**दस्तख़त**–पु. सही.
**दस्तगीर**–वि. मदतगार.
**दस्तनिगर**–वि. गरीब. [चिमटा.
**दस्तपनाह**–पु. विस्तव उचलण्याचा
**दस्तपाक**–पु. हात पुसण्याचा रुमाल.
**दस्त बदस्त**–अ. हातोहात.
**दस्तबरदार**–वि. एकाद्या वस्तूवरील आपला
**दस्तमाल**–पु. हातरुमाल. [अधिकार सोडणें.
**दस्तयाब**–वि. हस्तगत. [अंथरण्याची चादर.
**दस्तरख़ान**–पु. जेवणाच्या वेळीं ताटाखालीं
**दस्ता**–पु. मूठ, फुलांचा गुच्छ, कागदाचा दस्ता, शिपायांची तुकडी.

**दस्ताना**—पु. हातमोजा.

**दस्तार**—स्त्री. पगडी.

**दस्तारबंद**—पु. पगडी बांधणारा.

**दस्तावर**—वि. रेचक. [संबंधीचा लेख.

**दस्तावेज़**—स्त्री. दस्तऐवज, व्यवहारा-

**दस्ती**—वि. हाताचें. —स्त्री. मशाल, लहान मूठ, लहान दऊत. [पारशी धर्मगुरु.

**दस्तूर**—पु. वहिवाट, नियम, कायदा,

**दस्तूरी**—स्त्री. दलाली, कमिशन.

**दस्यु**—पु. दरवडेखोर, असुर, अनार्य, दास.

**दह**—पु. डोह, हौद. —स्त्री. ज्वाला.

**दहकना**—क्रि. अ. चेतणें, पेट घेणें, भडकणें, अंग तापणें. [शिलगावणें.

**दहकाना**—क्रि. स. चेतविणें, पेटविणें,

**दहड़ दहड़**—अ. धडाडून (पेटणें).

**दहन**—पु. अग्नि, बिब्बा, एक वृक्ष, कबुतर, दुष्ट मनुष्य, एक रुद्राचें नांव. तिनाची संख्या, जळण्याची क्रिया, कृत्तिका नक्षत्र, धूप, तोंड.

**दहना**—क्रि. अ. जळणें, संतप्त होणें. —क्रि. स. जाळणें, संताप आणणें. —वि.

**दहनि**—स्त्री. दहन, जळणें. [उजवा.

**दहपट**—वि. तळपट, जमीनदोस्त.

**दहपटना**—क्रि. स. उध्वस्त करणें, जमीन-

**दहर**—पु. डोह, हौद, कुंड. [दोस्त करणें.

**दहरना**—क्रि. अ. थरकांप होणें, भयभीत होणें. —क्रि. स. भिवविणें.

**दहलना**—क्रि. अ. थरकांप होणें.

**दहला**—पु. दश्या (पत्त्यांतील). —पु. परात.

**दहलाना**—क्रि. स. भिवविणें.

**दहलीज़**—स्त्री. उंबरा, उंबरठा.

**दहशत**—स्त्री. भीति.

**दहा**—पु. मोहरमचा महिना, मोहरमचे दहा दिवस, ताबूत. [दहं स्थान.

**दहाई**—स्त्री. दहावा, दशांश, संख्येंतील

**दहाड़**—स्त्री. हिंस्त्र पशूंची गर्जना. [रडणें.

**दहाड़ मारना**—किंकाळी फोडणें, मोठ्यानें

**दहाड़ना**—क्रि.अ. गरजणें, मोठमोठ्यानें

**दहाना**—पु. रुंद तोंड, नदीचें मुख, मोरी. [रडणें.

**दहिना**—वि. अनुकूल.

**दहिने**—अ. उजवीकडे.

**दहिने होना**—अनुकल होणें.

**दहिने बाएँ**—दोन्ही बाजूस.

**दही**—पु. दही.

**दही दही करना**—एकादी वस्तु विकत घेण्यास लोकांना सांगत फिरणें.

**दहु**—अ. किंवा, अथवा, कदाचित्.

**दहेंडी**—स्त्री. दह्याची हंडी.

**दहेज**—पु. हुंडा.

**दहेजू**—पु. हुंडा घेणारा.

**दाँ**—पु. जाणणारा, तज्ञ, माहितगार, वेळा.

**दाँग**—स्त्री. सहा रत्तीचें वजन, दिशा, सहावा भाग. —पु. डंका, टेकडी.

**दाँत**—पु. दांत, दाते (फणी, करवत वगैरेचे).

**दाँतों उँगली काटना या दाँतोंतले उँगली दबाना**—चकित होणें, मुग्ध होणें, खेद प्रगट

**दाँतकाटी रोटी**—दाट मैत्री. [करणें.

**दाँत खट्टे करना**—पराजय करणें. [खाणें.

**दाँत चबाना, दाँत पीसना**—रागानें दांतओठ

**(तालूमें) दांत जमाना**—साडेसाती ओढवणें.

**दाँत तले जबान दो**—तोंड आवरा, समजून

**दाँत तोड़ना**—हैराण करणें. [बोला.

**दाँत बैठ जाना**— दांतखीळ बसणें.

**दाँतोंमें तिनका लेना**—दांतीं तृण धरणें.

**दाँना**—क्रि. स. मळणी करणें.

**दाँय**—स्त्री. मळणी (धान्याची).

**दाँव**—पु. संधि, डाव.
**दाँवपेंच**—डावपेंच.
**दाँव चलना**—जिकणें, विजयी होणें.
**दाँव चलाना**—हानि करणें.
**दाँव पकड़ना**—डाव करणें (कुस्तीचा).
**दाँव बचाना**—युक्ति हाणून पाडणें.
**दाँव बैठना**—संधि निघून जाणें.
**दाँवनी**—स्त्री. दामिनी नांवाचा डोक्यांतील दागिना.
**दाँवरी**—स्त्री. दावें, दोर. [भोक, उष्णता.
**दा**—वि. दाता, देणारा.—स्त्री. रक्षा, दानू,
**दाईं**—वि. उजवी.
**दाई**—स्त्री. दाई.—वि. देणारी, देणारा.
**दाईसे पेट छुपाना**—माहितगारापासून एकादी गोष्ट लपविणें.
**दाऊँ**—पु. पाळी, खेप, स्थान, डाव.
**दाऊ**—पु. मोठा भाऊ, कृष्णाचा भाऊ बलदेव
**दाऊदखानी**—पु. उत्कृष्ट तांदुळ, पांढरे गहूं.
**दाख**—स्त्री, द्राक्ष, मनुका.
**दाख़िल**—वि. दाखल, सामील, पोहोंचलेला.
**दाख़िल करना**—दाखल करणें, जमा करणें.
**दाख़िल ख़ारिज**—पु. सरकारी कागदावर वारसाचें नांव बदलणें.
**दाख़िल दफ़्तर**—वि. ज्यावर विचार करावयाचा नाहीं असा ऑफीसांत दाखल करून घेतलेला कागद, निकालांत निघालेला कागद.
**दाख़िला**—पु. प्रवेश, शिरकाव.
**दाग**—पु. दाह, प्रेत जाळण्याची क्रिया.
**दाग देना**—प्रेत जाळण्याची क्रिया करणें.
**दाग़**—पु. डाग, चिन्ह, कलंक, जळण्याची खूण.
**दागना**—क्रि. स. जाळणें, डाग देणें, बंदुक तोफ वगैरे डागणें, चिन्ह करणें.
**दागबेल**—स्त्री. जमिनीवर पाया वगैरे खणण्यासाठीं कुदळ पावड्यानें केलेलीं चिन्हें.
**दागि, दागी**—वि. डाग असलेलें, कुजण्याचें चिन्ह असलेलें, कलंकित, शिक्षा भोग-
**दाघ**—पु. उष्णता, ईर्षा, मत्सर. [लेला.
**दाज(झ)न**—स्त्री. दाह, ईर्षा.
**दाज(झ)ना**—क्रि. अ. जळणें, द्वेष करणें. [—क्रि. स. जाळणें.
**दाड़स**—पु. एक सर्प.
**दाड़िम**—पु. डाळिंब.
**दाढ़**—स्त्री. दाढ, गर्जना, ओरड.
**दाढ़ मारकर रोना**—खूप जोरानें रडणें.
**दाढ़ना**—क्रि. स. जाळणें, भस्म करणें, संतप्त करणें.
**दाढ़ीजार**—पु. एक शिवी (स्त्रिया रागावल्यावर पुरुषांना देतात).
**दात**—पु. दाता, देणारा.
**दाता**—पु. दानशील, देणारा.
**दातार**—पु. पाहा 'दाता'.
**दाद**—स्त्री. न्याय, गजकर्ण.—पु. देणगी.
**दाद देना**—न्याय करणें, स्तुति करणें.
**दादनी**—स्त्री. द्यावयाची रक्कम, एकाद्या कामासाठीं आगाऊ दिलेली रक्कम.
**दाद फ़रियाद**—स्त्री. न्यायाची मागणी.
**दादा**—पु. (वडीलांचे वडील) आजा, वडील भाऊ, वडील माणसांकरितां आदर सूचक शब्द, गुरु. [फिर्यादी.
**दादी**—स्त्री. आजी (वडीलांची आई),
**दादु, दादि**—स्त्री. न्याय, प्रशंसा.
**दादुर**—पु. बेडूक. [साधु, दाद.
**दादू**—पु. धुनिया जातीचा पंथ प्रवर्तक
**दाध**—स्त्री. दाह, कष्टताप.
**दाधना**—क्रि. स. जाळणें, भस्म करणें.

**दान**–पु. दान, देणगी, औदार्य, लांच, नजराणा, रक्षण, कर, वसुल, हत्तीचा मद, शुद्धि.

**दानदाँ**–वि. ज्ञाता, माहितगार, आश्रय- [ दाता.

**दानपत्र**–पु. बक्षीस पत्र.

**दानलीला**–स्त्री. श्रीकृष्णाची एक लीला. (यांत श्रीकृष्णानें गोपींकडून दूध विकल्याबद्दल कर वसूल केला होता).

**दानव**–पु. राक्षस.

**दानवारी**–पु. विष्णु, देवता, हत्तीचा मद.

**दानवी**–वि. दानवाचें.–स्त्री. राक्षसी.

**दाना**–पु. दाणा, अन्न, चणें, बीं, लहान गोल वस्तु (जसें मोत्याचा दाणा, मणी, कण.)–वि. बुद्धिमान, ज्ञानी, चतुर.

**दानेदानेको तरसना**–खावयास न मिळणें.

**दानेदानेको मुहताज**–अत्यंत गरीब.

**दानाई**–स्त्री. बुद्धिमत्ता, हुशारी.

**दानापानी**–पु. खाणें, उपजीविका.

**दानिश**–स्त्री. अक्कल, समजूत.

**दानिशमं**–वि. बुद्धिमान, समजूतदार.

**दानिशमंदी**–स्त्री. बुद्धिमत्ता.

**दानिस्त**–स्त्री. खबर, ज्ञान.

**दानी**–वि. ठेवणारी, उदार, दानशूर. –पु. दान करणारी व्यक्ति, दान घेणारा, कर वसूल करणारा.

**दानेदार**–वि. दाणेदार, रवाळ.

**दानौ**–पु. दानव.

**दाप**–पु. अहंकार, जोर, उत्साह, क्रोध.

**दापक**–वि. अहंकारी, धमकाविणारा.

**दापना**–क्रि. स. दाबणें, मनाई करणें.

**दाब**–स्त्री. भार, आधिपत्य.

**दाभ**–पु. दर्भ. [ किंमत, नाणें, धन.

**दाम**–पु. दोरा, माला, समूह, विश्व, जाळें,

**दामके दाम पर**–मूळ किमतीस.

**दाम खड़ा करना**–किंमत भरून घेणें रक्कम उभी करणें.

**(चामके) दाम चलाना**–अधिकार मिळाल्या नंतर मन मानेल तसें वागणें.

**दाम दाम भर देना**–पै न पै चुकविणें.

**दामन**–पु. पदर, पर्वताच्या पायथ्याची जमीन.

**दामनगीर**–पु. मागें लागणारा, दावा [ करणार.

**दामाद**–पु. जावई.

**दामासाह**–पु. दिवाळखोर. [रक्कम.

**दामासाही**–स्त्री. घेणेदारांना मिळालेली

**दामिनी**–स्त्री. वीज, बिंदी, टिकली.

**दामी**–स्त्री. महसूल, कर.–वि. बहुमोल.

**दाय**–वि. देणारा. –पु. देणें, दान, देणगी, वडिलोपार्जित मिळकतीचा वाटा, हिस्सा, भिक्षावळ, वधूवरांस देणगी, नाश, थट्टेचें बोलणें, स्थान.

**दायम**–पु. वारस, दाता.–वि. देणारा.

**दायज, दायजा**–पु. हुंडा.

**दायनि–नी**–स्त्री. देणारी.

**दायक**–अ. सदा.

**दायमुलहब्स**–पु. जन्मठेप.

**दायमी**–वि. स्थायी.

**दायर**–वि. चालू, चालता, फिरता.

**दायर करना**–मुकदमा चालण्या करितां पुढें मांडणें, फिर्याद दाखल करणें.

**दायरा**–पु. वर्तुळ, वृत्त, कक्षा.

**दायाँ**–वि. उजवा.

**दाया**–स्त्री. दाई, कृपा, दया.

**दायाद**–पु. वाटेकरी, गोत्रज, मुलगा.–वि. इस्टेटींत हिस्सा मिळालेला.

**दायिनी**–स्त्री. देणारी.

**दायित्व**–पु. जबाबदारी, देणेदारी.
**दायी**–वि. दाता, ज्याच्यावर जबाबदारी आहे असा.
**दायें**–अ. उजवीकडे.
**दायें होना**–अनुकूल होणें, प्रसन्न होणें.
**दार**–पु. चीर, भेग, नांगरलेलें शेत, पत्नी, लाकूड, देवदार, सुतार, कारागीर.–प्रत्य. ठेवणारा.
**दारचीनी**–स्त्री. दालचिनी.
**दारण**–पु. चीरफाड करण्याचें काम, चीरफाड करण्याचें हत्यार, एक फळ.
**दारमदार**–पु. आश्रय, एकादें काम एकाद्यावर अवलंबून असणें.
**दारा**–स्त्री. पत्नी.
**दारिऊँ**–पु. डाळिंब.
**दारिका**–स्त्री. कन्या, बालिका.
**दारिद**–पु. दारिद्र.
**दारी**–स्त्री. दासी, चिखल्या.
**दारुजोषित**–स्त्री. कळसूत्री बाहुली.
**दारुण**–पु. विष्णु, शिव, एका नरकांचें नांव, रौद्र नांवाचें नक्षत्र, राक्षस, भयानक रस.–वि. विदारक, भयंकर, कठिण, दुःसह.
**दारुल्ख़िलाफ़त**–पु. राजधानी.
**दारुल्शफ़ा**–पु. हॉस्पिटल.
**दारू**–स्त्री. औषध, दारू, शोभेची दारू.
**दारूनारी**–स्त्री. लाकडी पुतळी.
**दारों–रो**–पु. डाळिंब.
**दारोग़ा**–पु. फौजदार.
**दाल**–स्त्री. डाळ, डाळीच्या आकाराची वस्तु, देवी व फोड यांवरील खपली.
**दाल गलना**–डाळ शिजणें, हेतु पूर्ण होणें.
**दालदलिया**–मिठभाकरी.
**दालमें कुछ काला होना**–काळें बेरें असणें.
**(जतियों) दाल बंटना**–आपसांत मोठी मारामारी होणें.
**दालमें मक्खी पड़ जाना**–विरस होणें, अस्वस्थ होणें.
**दालमोठ**–स्त्री. मसाला लावून तळलेली डाळ.
**दालान**–पु. ओसरी.
**दालिम**–पु. डाळिंब.
**दावँ**–पु. वेळ, पाळी, अनुकूल समय, उपाय, पेंच, कपट, खेळण्याची पाळी, स्थान.
**दावँना**–क्रि. स. मळणी करणें.
**दावँरी**–स्त्री. दावें, दोरी.
**दावत**–स्त्री. मेजवानी, जेवणाचें आमंत्रण.
**दावती**–पु. एक अलंकार.
**दावन**–पु. दमन, विळा.
**दावा**–पु. वणवा, हक्क, फिर्याद, टासून सांगणें.
**दावा करना**–टासून सांगणें, निश्चयपूर्वक सांगणें, फिर्याद करणें.
**दावात**–स्त्री. दऊत.
**दावादार**–पु. हक्क सांगणारा.
**दास**–पु. क्षुद्र, कोळी, सेवक, वृत्रासुर. –वि. तिरस्कार करणारा.
**दासन**–पु. अंथरूण.
**दासा**–पु. भिंतीला लागून बांधलेला अंगणांतील लहान चबुतरा, विळा, कोयता.
**दासी**–स्त्री. मजूर स्त्री, दासी, वेदी, एक औषध.
**दास्तान**–स्त्री. वृत्तांत, गोष्ट, वर्णन.
**दाह**–पु. जळण्याची क्रिया, प्रेत जाळण्याची क्रिया, आग, संताप, शोक, ईर्षा.
**दाहक**–वि. जळणारा. –पु. अग्नि.
**दाहना**–क्रि. स. जाळणें, अत्यंत दुःख देणें. –वि. उजवा.
**दाहिना**–वि. उजवा, अनुकूल.
**दाहिना देना**–प्रदक्षिणा घालणें.
**दाहिनें**–अ. उजव्या बाजूस.
**दिअली**–स्त्री. पणती.
**दिआ**–पु. दिवा.
**दिउली**–स्त्री. खपली, पणती, डाळ, मुंडावळ.

**दिक**–स्त्री. दिशा, बाजू.
**दिक्**–पु. क्षयरोग.–वि. त्रस्त, हैराण, दुःखी.
**दिक् करना**–त्रास देणें, सतावणें.
**दिक्क**–पु. हत्तीचा छावा.
**दिक्कत**–स्त्री. अडचण, त्रास, कठिणता.
**दिक्कर**–पु. तरुण.
**दिक्करी**–स्त्री. तरुणी.
**दिखलवाई**–स्त्री. दाखविण्याची मजूरी.
**दिखलवाना**–क्रि. स. दुसऱ्याकडून दाखविणें.
**दिखलाई**–स्त्री. पाहण्याची किंवा तपासण्याची फी.
**दिखलाना**–क्रि. स. दाखविणें.
**दिखहार**–पु. दर्शक, पाहणारा.
**दिखाई**–स्त्री. पाहण्याचें किंवा दाखविण्याचें काम, पाहण्याकरितां किंवा दाखविण्याकरितां दिलेला पैसा.
**दिखाऊ**–वि. पाहण्यायोग्य, नुसतें पाहण्या जोगें, बनावट.
**दिखाना**–क्रि. स. दाखविणें.
**दिखाव**–पु. देखावा, पाहण्याची क्रिया.
**दिखावटी**–वि. दाखविण्यापुरतें, दिखाऊ.
**दिखावा**–पु. देखावा, ढोंग, दिखाऊपणा.
**दिखैया**–पु. पाहणारा, दाखविणारा.
**दिखौआ**–वि. दिखाऊ.
**दिग**–पु. दिशा.
**दिग्गज**–पु. पृथ्वीच्या आठ दिशेचे हत्ती.
**दिग्घ**–वि. दीर्घ, लांब.
**दिग्विजय**–पु. युद्धद्वारां चारी दिशांवर मिळविलेला विजय.
**दिठवन**–पु. कार्तिक शुद्ध एकादशी.
**दिठौना**–पु. तीट.
**दिढ़**–वि. मजबूत.
**दिढ़ाना**–क्रि. स. प्रमाणित करणें, मजबूत करणें, निश्चित करणें.
**दितिसुत**–पु. दैत्य.

**दिन**–पु. दिवस.
**दिनकर**–पु. सूर्य.
**दिन चढ़ना**–सूर्योदय होणें.
**दिन छिपना या डूबना**–सूर्य मावळणें.
**दिन ढलना**–संध्याकाळ होणें.
**दिन दूना रात चौगुना होना**–शुक्लेंदुवत् वृद्धिगत होणें, भरभराट होणें.
**दिनदहाड़े**–दिवसा ढवळ्या, भर दिवसा.
**दिन काटना या पूरे करना**–वेळ घालविणें, गुजराण करणें, निर्वाह करणें.
**दिनको तारे दिखाई देना**–मन जागेवर नसणें.
**दिनमान**–पु. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतचा वेळ.
**दिनराई**–पु. सूर्य.
**दिनाई**–स्त्री. विषारी.
**दिना ती**–स्त्री. मजूरांची एक दिवसाची मजूरी.
**दिनियर, दिनेर**–पु. सूर्य.
**दिनी**–वि. फार दिवसाचें, जुनें.
**दिनौंधी**–स्त्री. दिवसा न दिसणें, दिवसांधळें.
**दिपति**–स्त्री. प्रकाश.
**दिपना**–क्रि. अ. प्रकाशणें.
**दिब**–पु. दिव्य, परीक्षा.
**दिमाग**–पु. मेंदू, गर्व, बुद्धि, अक्कल.
**दिमाग आस्मानपर होना या चढ़ना**–अत्यंत अहंकार होणें.
**दिमाग खाली करना**–डोकेंफोड करणें.
**दिमाग चाटना या खाना**–डोकें उठविणें.
**दिमागदार**–वि. बुद्धिमान, गर्विष्ठ.
**दिमागी**–वि. अभिमानी, गर्विष्ठ, तीव्र मानसिक शक्ति असलेला.
**दियट**–स्त्री. ठाणवई, दिवा ठेवण्याची तिवई.
**दियना**–पु. दिवा.–क्रि. अ. चमकणें.

**दियारा**–पु. मळाची जमीन, प्रदेश, प्रांत.
**दियासलाई**–स्त्री. आगकाडी.
**दिरद**–पु. हत्ती. [साडेतीन मासे वजन.
**दिरम**–पु. मिसर देशचें चांदीचें एक नाणें,
**दरमान**–पु. इलाज, उपचार, चिकित्सा.
**दरमानी**–पु. वैद्य.
**दिल**– पु. हृदय, मन, साहस, प्रवृत्ति.
**दिल कड़ा करना**–हिंमत बांधणें.
**दिलका बादशाह**–अत्यंत उदार, लहरी.
**दिलके फफोले फोड़ना**–आपला राग काढणें, चांगलें वाईट बोलून आपला राग शांत करणें.
**दिल थोड़ा करना**–मनांत क्षुद्र विचार येणें.
**दिल देना**–प्रेम करणें.
**दिलसे**–मनापासून, मन लावून. [लागणें.
**दिल उचटना**–चित्त उदास होणें, मन न
**दिलका कँवल खुलना**– फार प्रसन्न होणें.
**दिल गिरना**–उदास होणें.
**दिल जमना**–मन लागणें.
**दिल निकाल कर रखना**–हृदय उघडून दाखविणें, अत्यंत हित करणें.
**दिल फिर जाना**–वैर होणें.
**दिल बुझना**–उत्साहरहित होणें.
**दिल मसोसना**–चुरमुरे खात राहणें.
**दिलमें फरक आना**–मन कलुषित होणें.
**दिल लगाना**–प्रेम करणें, मन लावणें.
**दिलकश,दिलकुशा**–आकर्षक, मनोहर.
**दिलगीर**–वि. उदास, दुःखी.
**दिलचला**–वि. साहसी, शूर.
**दिलचस्प**–वि. चित्ताकर्षक.
**दिलचस्पी**–स्त्री. आवड, गोडी.
**दिलजमई**–स्त्री. सांत्वना.
**दिलजला**–वि. दुःखी.
**दिलजोई**–स्त्री. समाधानी वृत्ति.
**दिलदादा**–वि. प्रेमी.
**दिलदार**–वि. प्रेमी, उदार, रसिक.
**दिलबर**–वि. प्रिय.
**दिलबस्तगी**–स्त्री. प्रेम, मनोरंजन.
**दिलबस्ता**–वि. आसक्त, प्रेमी.
**दिलरुबा**–पु. स्त्री, प्रियकर, प्रेमपात्र.
**दिलवाना**–क्रि. स. देवविणें.
**दिलशाद**–वि. प्रसन्न.
**दिला**–पु. 'दिल' चें संबोधन, हे मना.
**दिलाना**–क्रि. स. देवविणें, प्राप्त करविणें.
**दिलारा**–वि. प्रिय. [साहसी.
**दिलावर**–वि. शूर, बहादूर, उत्साही,
**दिलावरी**–स्त्री. वीरता, बहादुरी, साहस,
**दिलावेज़**–वि. सुंदर. [उत्साह.
**दिलासा**–पु. धीर.
**दिली**–वि. हार्दिक.
**दिलेर**–वि. वीर, साहसी.
**दिलेराना**–वि. वीरोचित.
**दिलेरी**–स्त्री. वीरता, साहस.
**दिल्लगी**–स्त्री. थट्टा.
**दिल्लगीबाज़**–पु. थट्टेखोर, विनोदी.
**दिल्लगी उड़ाना**–उपहास करणें.
**दिव**–पु. स्वर्ग, आकाश, वन, दिवस.
**दिवस**–पु. दिवस.
**दिवाकर**–पु. सूर्य, कावळा, सूर्यकमळ.
**दिवाल**–वि. दाता. –स्त्री. भिंत.
**दिवाला**–पु. दिवाळें, एकादी वस्तु मुळींच शिल्लक न राहणें.
**दिवाला मारना**–दिवाळें काढणें.
**दिवालिया**–दिवाळखोर.
**दिव्य**–वि. स्वर्ग आणि आकाशाशीं संबंध ठेवणारा, अलौकिक, अत्यंत सुंदर.

—पु. शपथ, मनुष्य दोषी कीं निर्दोषी हें जाणण्या करितां करावयाची परीक्षा.
**दिव्यता**—स्त्री. सौंदर्य.
**दिशा**—स्त्री. बाजू, दहाची संख्या, दहा-
**दिष्टि, दिसिटि**—स्त्री. दृष्टि. [दिशा.
**दिसंबर**—पु. डिसेंबर.
**दिस**—त्री. दिशा.
**दिसा**—पाहा 'दिशा'.
**दिसावर**—पु. परदेश.
**दिसावरी**—वि. परदेशी (माल).
**दिसिकुंजर**—पाहा 'दिग्गज'. [स्वामी.
**दिसिप, दिसिपति, दिसिराज**—पु. दिशांचा
**दिसि—सी**—स्त्री. दिशा.
**दिसैया**—वि. पाहणारा, दाखविणारा.
**दिहंदा**—वि. दाता, देणारा.
**दिहाड़ा**—पु. वाईट स्थिति, दिवस.
**दिहात**—पु. खेडें.
**दिहाती**—वि. खेडवळ, ग्रामीण.
**दीअट, दीआ**—पु दिवा.
**दीक्षा**—स्त्री. उपदेश, गुरुमंत्र.
**दीक्षित**—वि. विधिपूर्वक दीक्षा घेतलेला. —पु. ब्राह्मणाची एक पदवी.
**दीखना**—क्रि. अ. दिसणें.
**दीगर**—वि. अन्य, दुसरा.
**दीघी**—स्त्री. मोठी विहिर, तलाव.
**दीठ**—स्त्री. दृष्टि, टक, दृष्ट, देखरेख, ओळख, कृपादृष्टि, उमेद, संकल्प.
**दीठ जलाना**—दृष्ट काढणें.
**दीद**—स्त्री. दर्शन.
**दीदा**—पु. दृष्टि, डोळा, अनुचित साहस.
**दीदा लगना**—मन लागणें.
**दीदे का पानी ढल जाना**—निर्लज्ज होणें.
**दीदा व दानिस्ता**-अ.जाणूनबुजून,बुद्धिपुरसर.
**दीदार**—पु. दर्शन.
**दीदी**—स्त्री. मोठी बहिण. [नम्र.
**दीन**—पु. धर्म.—वि. गरीब, दुःखी, उदास,
**दीनदार**—वि. धार्मिक, आपल्या धर्मावर श्रद्धा ठेवणारा.
**दीनदुनिया**—स्त्री. इहलोक, परलोक.
**दीनार**— पु. सोन्याचा दागिना, मोहर.
**दीपक**—पु. दिवा, एक अर्थालंकार.—वि. प्रकाश देणारा, पाचक, उत्तेजक.
**दीपत**—स्त्री. दीप्ति, कांति, चमक, शोभा, कीर्ति.
**दीपना**—क्रि. अ. चकाकणें, प्रकाशणें.—क्रि. स. प्रकाशित करणें.
**दीपसखा**—स्त्री. ज्योति.
**दीप्त**—वि. प्रकाशित, प्रज्वलित.
**दीबाचा**—पु. प्रस्तावना, भूमिका.
**दीमक**—स्त्री. वाळवी (किडा).
**दीयट**—स्त्री. दिवा ठेवण्याची तिवई, दिवा.
**दीया**—पु. दिवा.
**दीयासलाई**—स्त्री. आगकाडी.
**दीरघ**—वि. दीर्घ, लांबट, मोठा.
**दीर्घ**—वि. आयत, लांब, मोठा.—पु. एक-प्रकारचें झाड, उंट, जोतिषशास्त्रांतील सिंह, कन्या, तुळ, आणि वृश्चिक रास, संगीतांत दोन मात्रांचा स्वर.
**दीर्घता**—स्त्री. लांबी.
**दीर्घश्रुत**—वि. दूरवर ऐकूं जाणारा, विख्यात,
**दीर्घिका**—स्त्री. लहान तलाव. [नांवाजलेला.
**दीवान**—पु. राजसभा, दिवाण, राजाचा मंत्री, गज्जल संग्रह.
**दीवानआम**—खुला दरबार भरण्याची जागा.
**दीवान खास**—खाजगी दरबार भरण्याची जागा.

**दीवाना**–वि. वेडा.
**दीवानी**–स्त्री. दिवाणगिरी, संपत्तीसंबंधीं न्याय देणारें न्यायालय.
**दीवार**–भिंत, पार्श्वभूमि.
**दीवारगीर**–देवळी.
**दीवाली**–स्त्री. दिवाळी.
**दीसना**–क्रि. स. नजरेस येणें, दिसणें.
**दीह्**–वि. दीर्घ, मोठा.
**दुंद**–पु. उत्पात, द्वंद्व, दोन मनुष्यांतील युद्ध अथवा झगडा.–पु. नगारा.
**दुंदुभि**–स्त्री. नगारा.–पु. वरुण, विष, एक [राक्षस.
**दुंदुह**–पु. विरोळा.
**दुंबा**–पु. जाड शेपूट असलेला मेंढा.
**दु**–वि. 'दो'चे संक्षिप्त रूप, दोन.
**दुआ**–स्त्री. प्रार्थना, विनंति, आशीर्वाद.
**दुआ मॉंगना**–आशीर्वाद देणें, प्रार्थना करणें.
**दुआ लगना**–आशीर्वाद फळास येणें.
**दुआबा**–पु. दोन नद्यांच्या मधला प्रदेश.
**दुआर**–पु. दरवाजा, द्वार.
**दुआरी**–स्त्री. लहान दरवाजा.
**दुआल**–स्त्री. कातडे, कातडयाचा पट्टा, [रिकबीचा पट्टा.
**दुइ-ई**–वि. दोन.
**दुइज**–स्त्री. द्वितीया.–पु. द्वितीयेचा चंद्र.
**दुकड़ा**–पु. जोडी, छदाम.
**दुकान**–स्त्री. दुकान.
**दुकाल**–पु. दुष्काळ.
**दुकूल**–पु. रेशमी वस्त्र, तलम वस्त्र, वस्त्र.
**दुकेला**–वि. सोबती असलेला.
**(अकेला) दुकेला**–एकटा दुकटा.
**दुकेले**–दुसऱ्याच्या बरोबर. [नावा.
**दुक्कड़**–पु. चौघडा, एकत्र जोडलेल्या दोन
**दुक्का**–वि. दोन, ज्याच्याबरोबर दुसरा आहे असा, दोन ठिपके असलेला पत्ता.
**(इक्का) दुक्का**–एकटा दुकटा.
**दुक्की**–स्त्री. पत्त्यांतला दोन ठिपके असलेला पत्ता, दुर्री. [दोन वेळचा.
**दुखंडा**–पु. ज्याच्यांत दोन खंड आहेत असा,
**दुखड़ा**–पु. करुण कहाणी, रडगाणें, कष्ट, विपत्ति.
**दुखड़ा रोना**–स्वत:ची करुण कहाणी सांगणें, दु:ख सांगणें.
**दुखना**–क्रि. अ. दुखणें, पीडा होणें.
**दुखरा**–पु. पाहा 'दुखड़ा.'
**दुखाना**–क्रि. स. दु:ख देणें, दुखविणें.
**दुखानो**–वि. वाफेच्या जोरावर चाल-
**दुखारा-री**–वि. दु:खी, कष्टी. [णारी.
**दुखिया**–वि. दु:खी.
**दुखियारी**–वि. दु:खी (स्त्री), रोगी.
**दुखी**–वि. कष्टी, मानसिक कष्ट असणारा,
**दुखौंहाँ**–वि. दु:खदायक. [रोगग्रस्त.
**दुख़्तर**–स्त्री. मुलगी.
**दुगई**–स्त्री. ओसरी.
**दुगदुगी**–स्त्री. छातीच्या मध्यावरचा खोल भाग, गळयांतील एक दागिना.
**दुगना**–वि. दुप्पट.
**दुगुन**–वि. दुप्पट.
**दुगुना**–वि. दुप्पट.
**दुग्ग**–पु. दुर्ग, किल्ला.
**दुचंद**–वि. दुप्पट.
**दुचित**–वि. अस्थिर मनाचा, चिंताग्रस्त.
**दुचिताई**–स्त्री. संदेह, चित्ताची अस्थिरता.
**दुचिताई, दुचित्ती**–स्त्री. पाहा 'दुचिताई.'
**दुचित्ता**–वि. अस्थिर मनाचा, शंकाग्रस्त, [चिंताग्रस्त.
**दुज**–पु. द्विज.
**दुजानू**–अ. दोन्ही गुडघे टेकून. [गरुड.
**दुजेश**–पु. ब्राम्हणश्रेष्ठ, चंद्र, कापूर,

**दुज़्द**–पु. चोर.
**दुज़्दीदा**–वि. चोरीचें.
**दुटूक**–वि. दोन तुकडे झालेला, तुटलेला.
**दुटूक बात**–थोडक्यांत पण स्पष्ट कथन.
**दुत्**–अ. धुत, तुच्छतेचे उद्‌गार. [कार.
**दुतकार**–पु. धुतकार.–स्त्री धिक्कार झिड-
**दुतकारना**–क्रि. स. धुडकावून लावणें, झिडकारणें.
**दुतर्फा**–वि. दोन्ही बाजूला. [किरण.
**दुति**–स्त्री. कांति, तेज, शोभा, सौंदर्य,
**दुति(ती)या**–स्त्री. द्वितीया (तिथि).
**दुदलाना**–क्रि. स. झिडकारणें. [कापड.
**दुदामी**–स्त्री. माळव्यांतील एक सुती
**दुदिला**–वि. व्यग्र, गोंधळलेला.
**दुधमुँहा**–वि. तान्हेबाळ.
**दुधाँडी**–वि.दुधाची चरवी. [देणारी.
**दुधार, दुधैल**–वि. दुधाळ, पुष्कळ दूध.
**दुधिया**–वि. दुधाच्या रंगाचा, दूध मिसळ-लेला.–स्त्री. एका जातीचें गवत, एक प्रकारचें विष, एक प्रकारची पांढरी
**दुनवना**–क्रि. अ. दुमडणें. [माती.
**दुनियाँ–या**–स्त्री. जग.
**दुनियाकी हवा लगना**–व्यवहारज्ञान होणें.
**दुनियाके परदेपर**–संबंध जगांत.
**(दीन) दुनिया**–लोक परलोक.
**दुनियादार**–वि. संसारांत गुरफटलेला व्यवहारकुशल.–पु. गृहस्थ.
**दुनियादार**–स्त्री. प्रपंच, व्यवहार.
**दुनियावी**–वि. लौकिक, व्यवहारिक.
**दुनिया साज़**– वि. मतलबी, व्यवहार
**दुनी**–स्त्री. दुनिया, जग. [चतुर.
**दुपट्टा**–पु. चादर, उपरणें.
**दुपट्टा तानकर सोना**–निश्चितपणें, झोपणें, पांघरूण घेऊन स्वस्थ झोपणें.
**दुपहर**–स्त्री. दुपार. [फुलझाड.
**दुपहरिया, दुपहरी**–स्त्री. दुपार, एक
**दुफसली**–वि. दोन्ही हंगामांत होणारें पीक.
**दुबकना**–क्रि. अ. दबून बसणें, लपणें.
**दुबधा**–स्त्री. संशय, मनाची अस्थिरता, चिंता.
**दुबराना**–क्रि. अ. दुबळें होणें, क्षीण होणें.
**दुबला**–वि. दुबळा, अशक्त, सडपातळ, कृश.
**दुबलापन**–पु. क्षीणता, कृशता.
**दुबारा**–अ. दुसऱ्यांदा, फिरून.
**दुबाला**–वि. दुप्पट.
**दुबिद, द्विविद**–पु. रामचंद्राच्या सैन्यांतील
**दुभाखी**–पु. दुभाषी. [एका वानराचें नांव.
**दुभावि**–वि. दोन भाव जाणणारा.
**दुमंजिला**–वि. दोन मजली (घर).
**दुम**–स्त्री. शेपटी, शेपटीप्रमाणें मागें लागलेली वस्तु, मागें मागें राहणारा मनुष्य, एकाद्या कामाचा शेवटचा भाग.
**दुम दबाकर भागना**–शेपूट घालून पळणें.
**दुम हिलाना**–गोंडा घोळणें.
**दुमची**–स्त्री. घोड्याच्या शेपटीखालील
**दुमाता**–वि. सावत्र आई. [चामड्याचा पट्टा.
**दुमानी**–वि. द्वयर्थी. [दुर्गम, दुर्जेय.
**दुरंत**–वि. कठिण, घोर, प्रचंड, अशुभ,
**दुरतिक्रम**–वि. अपार, प्रबळ, अजिंक्य,
**दुरद**–पु. हत्ती. [अलंघनीय.
**दुरदाम**–वि. दुर्दम, कष्टसाध्य.
**दुरदुराना**–क्रि. स. धुडकावणें, झिडकारणें.
**दुरना**–क्रि. अ. दूर होणें, नजरेआड होणें,
**दुरपदी**–स्त्री. द्रौपदी. [लपणें.
**दुरभिसंधि**–स्त्री. दुष्ट विचार, दुष्ट बेत.
**दुरमुस**–पु. गदेच्या आकाराचा दंडुका

(जमीन चोपण्याचा).
**दुराचार**–पु. वाईट आचरण.
**दुराचारी**–वि. वाईट आचरणाचा.
**दुराज**–पु. द्विदल राज्यपद्धति, एका राज्यावर दोन राजांचा अधिकार. –पु. वाईट राज्य.
**दुराधर्ष**–पु. विष्णु, पांढरा सिरस. –वि. दुर्दमनीय, अभिमानी, प्रबळ.
**दुराना**–क्रि. अ. दूर होणें, लपणें. –क्रि. स. दूर करणें, लपविणें.
**दुराराध्य**–वि. ज्याला संतुष्ट करणें कठिण [आहे असा.
**दुराव**–पु. भेदभाव, कपट.
**दुरासा**–स्त्री. खोटी आशा.
**दुरुखा**–वि. दोन्ही बाजूस तोंड असलेला, दुतोंडया, दुरंगी.
**दुरुस्त**–वि. चांगल्या स्थितींत असलेला, ठीक, धड, उचित, यथार्थ.
**दुरुस्ती**–स्त्री. सुधारणा, दुरुस्ती.
**दुरूद**–स्त्री. आशीर्वाद, प्रार्थना, महम्मद पैगंबराची स्तुति.
**दुरूह**–वि. कठिण, दुर्गम.
**दुरेफ, द्विरेफ**–पु. भ्रमर, भुंगा.
**दुर्ग**–पु. किल्ला, कोट, एका असुराचें नांव.
**दुर्गत**–वि. दुर्गतीस प्राप्त झालेला, दरिद्री. –स्त्री. पाहा 'दुर्गति'.
**दुर्गति**–स्त्री. नरक, वाईट स्थिति, कठिण रस्ता, दुर्दशा. –वि. गरीब.
**दुर्गपाल**–पु. किल्लेदार.
**दुर्गम**–वि. पोंचण्यास कठिण, समजण्यास कठिण, बिकट. –पु. किल्ला, विष्णु, जंगल, एका असुराचें नांव.
**दुर्गा**–स्त्री. आदिशक्ति, सृष्टि.
**दुर्गाध्यक्ष**–पु. किल्लेदार.
**दुर्घट**–वि. करावयासकठिण, व्हावयास कठिण.
**दुर्घटना**–स्त्री. अपघात, संकट, आपत्ति.
**दुर्जन**–पु. दुष्ट माणूस.
**दुर्जनता**–स्त्री. दुष्टपणा. [विपन्नावस्था.
**दुर्दशा**–स्त्री. वाईट स्थिति, मातेरें, बिचका,
**दुर्दिन**–पु. मेघांनीं आकाश व्याप्त झालें आहे असा दिवस, वृष्टि.
**दुर्बल**–वि. अशक्त, निरुत्साही, गरीब.
**दुर्बलता**–स्त्री. अशक्तपणा, म्लानता, गरीबी.
**दुर्भिक्ष**–पु. महागाई, कोणत्याहि पदार्थाचा
**दुर्मद**–वि. उन्मत्त, उग्र, हेकट. [तुटवडा.
**दुर्र**–पु. मोती, नथ.
**दुर्रा**–पु. चाबूक. [आढळणारा.
**दुर्लभ**–वि. मिळावयास कठिण, क्वचित
**दुर्वासन-ना**–स्त्री. वाईटाकडे कल, भलत्याच गोष्टीची इच्छा.
**दुर्वासा**–पु. एका ऋषीचें नांव.
**दुलकी**–स्त्री. घोडयाची दुडकी चाल.
**दुलत्ती**–स्त्री. दुगाणी, घोडया गाढवाचें मागचे दोन पाय उचलून लाथा मारणें.
**दुलदुल**–पु. पैगंबराला भेट मिळालेली खेचरी.
**दुलराना**–क्रि. स. बालकाचे लाड करणें. –क्रि. अ. लाडक्या मुलाप्रमाणें वागणें.
**दुलहन, दुलहिन दुलहिया, दुलही**–स्त्री. नवरी, वधू.
**दुलहा, दूलहा**–पु. नवरा मुलगा.
**दुलार**–पु. लाड, प्रेम.
**दुलारना**–क्रि. स. लाड करणें, प्रेम करणें.
**दुलारा**–वि. लाडका.
**दुलारी**–वि. प्रिय कन्या, लाडकी मुलगी.
**दुली(लै)चा**–पु. गालीचा.

**दुलोही**–स्त्री. एक तलवार.
**दुव**–वि. दोन.
**दुवन**–वि. दुष्ट, राक्षस, शत्रु.
**दुविधा**–स्त्री. संशय, गोंधळ (मनाचा).
**दुशनाम,दुश्नाम**–स्त्री. शिवी.
**दुशवार,दुश्वार**–वि. मुष्किल, दुःसह.
**दुशाला**–पु. शाल.
**दुशासन**–पु. दुःशासन (धृतराष्ट्राचा पुत्र).
**दुशमन, दुश्मन**–पु. शत्रु.
**दुशमनी, दुश्मनी**–स्त्री. वैर, शत्रुता.
**दुष्ट**–वि. अधम, नीच, खोटा, दुराचारी.
**दुष्टता**–स्त्री. नीचता.
**दुसरिहा**–वि. जोडीदार, मित्र, प्रतिस्पर्धी.
**दुसह**–वि. असह्य, मर्मभेदक.
**दुसाध**–पु. डोंब, भंगी.
**दुसार, दुसाल**–पु. आरपार भोंक. –अ. आरपार.
**दुसूती**–स्त्री. एक प्रकारची जाड चादर.
**दुसेजा**–पु. मोठा पलंग.
**दुस्तर**–वि. पार करण्यास कठिण, बिकट.
**दुहता**–पु. नातू, मुलीचा मुलगा. [(काम).
**दुहत्था**–वि. दोन्ही हातांनीं केलेलें, दुहाती
**दुहना**–क्रि. स. धार काढणें, पिळून काढणें.
**दुहनी**–स्त्री. धार काढण्याचें भांडें.
**दुहराना**–क्रि. स. आवृत्ति करणें.
**दुहाई**–स्त्री. घोषणा, धार काढण्याचें काम, धार काढण्याची मजूरी.
**दुहाई देना**–एकाद्याचें नांव घेऊन मदतीसाठीं हांक मारणें.
**दुहाई फिरना**–नव्या राजाची घोषणा होणें, यशोदुंदुभि झडणें.
**दुहाग**–पु. दुर्भाग्य, वैधव्य.
**दुहागिनी**–स्त्री. विधवा.
**दुहागी**–वि. दुर्दैवी.
**दुहाना**–क्रि. स. धार काढविणें.
**दुहार**–पु. दूध काढणारा.
**दुहावनी**–स्त्री. पाहा 'दुहाई'.
**दुहिन**–पु. ब्रम्हदेव.
**दुहुं–हूँ**–वि. दोघेहि. [त्रासदायक काम.
**दुहेला**–वि. कठिण, दुःसाध्य, दुःखी.–पु.
**दूँद**–पु. ढेरी
**दूईज**–स्त्री. द्वितीया (तिथि).
**दूक**–वि. कांहीं.
**दूकान**–स्त्री. दुकान. [करणारा.
**दूकानदार**–पु. दुकानाचा मालक, दुकान
**दूखना**–क्रि. स. दोष लावणें, दोष देणें.
**दूज**–स्त्री. द्वितीया (तिथि).
**दूजका चांद होना**–दर्शन दुर्लभ होणें.
**दूत**–पु. बातमी किंवा पत्र पोंचविणारा मनुष्य, एका राजाकडून दुसऱ्या राजाकडे कांहीं सूचना पोंचविणारा मनुष्य. [स्त्री, कुंटीण.
**दूती**–स्त्री. निरोप नेणारी किंवा आणणारी
**दूध**–पु. दूध.
**दूधका दूध और पानीका पानी करना**–बरोबर न्याय करणें.
**दूधकी मक्खीकी तरह निकालना**–खड्या सारखें बाजूस काढणें, तुच्छ समजून दूर करणें.
**दूधके दांत न टूटना**–बालपण असणें.
**माताके दूधको लजाना**–करूं नये तें कार्य करणें. [समृद्धि असो.
**दुधों नहाओ पूतों फलो**–पुत्रपौत्र धनधान्य
**दूध फटना**–दूध चोथपाणी होणें, दूध नासणें.
**दूध पिलाई**–स्त्री. दाई.
**दूधपूत**–पु. धन आणि संतति.

**दूधमुँहा, दूधमुख**–वि. लहान मूल.
**दूधिया**–वि. दुधाच्या रंगाचा, पांढरा, स्वच्छ, दूध मिसळलेला.–पु. एक पांढरें रत्न, एक पांढरा दगड.
**दून**–स्त्री. दुप्पट.–पु. तराई.
**दूनकी लेना अथवा हांकना**–प्रौढी
**दूना**–वि. दुप्पट. [मिरवणें, बाता मारणें.
**दूनों**–वि. दोघेहि.
**दूब**–स्त्री. दर्वा, हरळी.
**दूबदू**–अ. समोरासमोर.
**दूबरा**–वि. दुबळा, अशक्त.
**दूभर**–वि. कठिण.
**दूमना**–क्रि. अ. हलणें, डोलणें.
**दूरंदेश**–वि. दूरदर्शी.
**दूर**–अ. दूर.–वि.–लांबचा.
**दूरकी बात**–स्त्री. भविष्यकालीन गोष्ट.
**दूर दराज**–वि. फार दूर.
**दूरबीन**–स्त्री. दुर्बीण.
**दूरी**–स्त्री. अंतर.
**दुलह, दूल्हा**–पु. वर, पति. [भंग.
**दूषण-न**–वि. निंदा, दोष, आक्षेप, वचन
**दूषित**–वि. निंदलेला, विटाळलेला, मलिन झालेला किंवा केलेला, कलंकित, भ्रष्ट झालेली (स्त्री).
**दूसरा**–वि. दुसरा.
**दूहना**–क्रि. स. पाहा 'दुहना'.
**दूहा**–पु. दोहा.
**दूहाना**–पाहा 'दुहाना'. [दोनाची संख्या.
**दृग**–पु. दृष्टी, पाहण्याची शक्ति, डोळा,
**दृढ**–वि. मजबूत, लठ्ठ, स्थायी, कठिण, धीट, कठोर हृदयी, भरीव.–पु. लोखंड, विष्णु, हिरा.
**दृढता**–स्त्री. बळकटपणा, स्थिरता.
**दृढ़ाना**–क्रि.अ. दृढ होणें.–क्रि.स. दृढ करणें.
**दृश्य**–वि. पाहण्यायोग्य, पाहण्यांत येणारा, समजण्यायोग्य, सुंदर.–पु. डोळ्या समोरील पदार्थ, डोळ्यासमोर होणाऱ्या मनोरंजक गोष्टी.
**दृष्टांत**–पु. दाखला, एक अर्थालंकार.
**दृष्टि**–स्त्री. नजर, पाहण्याची वृत्ति, प्रकाश, ओळख, अनुमान, डोळ्यांचें तेज, कृपादृष्टि, आशा, उद्देश. [देवी.
**दे, देई**–स्त्री. स्त्रियांचा आदर सूचक शब्द,
**देखनहारा**–पु. पाहणारा, निरीक्षक.
**देखना**–क्रि. स. पाहणें, तपासणें, पारखणें, शोधणें, नजर ठेवणें, समजणें, भोगणें, वाचणें.
**देखना सुनना**–माहिती घेणें.
**देखते रह जाना**–पाहात राहणें, चकित होणें.
**देखभाल**–स्त्री. देखरेख, निरीक्षण, पाहणी.
**देखराना, देखरावना**–क्रि. स. दाखविणें,
**देखाऊ**–वि. दिखाऊ, कृत्रिम. [समजावणें.
**देखादेखी**–स्त्री. दर्शन.–अ. दुसऱ्याचें पाहून, अनुकरण करून.
**देखाव**–पु. दृष्टीचा टप्पा, थाटमाट.
**देखावट**–स्त्री. देखावा, दिग्दर्शन, थाटमाट.
**देग**–पु. हंडा (अन्न शिजविण्याकरितां).
**देगचा**–पु. लहान भांडें.
**देगची**–स्त्री. भांडें.
**देन**–स्त्री. देणगी, दिलेली वस्तु, दान.
**देनदार**–पु. देणेदार, कर्जदार.
**देना**–क्रि. स. देणें, सोपविणें, ठेवणें, हवाली करणें, मारणें, काढणें, बंद करणें.–पु. कर्ज.
**देर, बेरी**–स्त्री. उशीर, वेळ.
**देरपा**–वि. टिकाऊ.

**देरीना**–वि. प्राचीन.
**देव**–पु. ईश्वर, देवता, पूज्य व्यक्ति, ब्राह्मण व मोठ्या माणसांना आदर सूचक शब्द, दैत्य, राक्षस, बलवान मनुष्य, प्रति, पारा, धर्म, इंद्रिय.
**देवऋषि**–पु. नारदादि ऋषि.
**देवक**–वि. देवाचा.
**देवठान**–पु. कार्तिक शुद्ध एकादशी.
**देवता**–पु. देव, कार , मूर्ति, देवशक्ति, [ इंद्रिय.
**देवधुनि**–स्त्री. गंगानदी.
**देवपथ**–पु. आकाश.
**देवर**–पु. दीर, नवऱ्याचा धाकटा भाऊ.
**देवरा**–पु. दैवत, लहानदेव, दीर.
**देवरानी**–स्त्री. धाकट्या दिराची बायको, धाकटी जाऊ.
**देवल**–पु. पुजारी, देऊळ, धार्मिक पुरुष, नारद मुनि, एक प्रकारचा तांदुळ.
**देवसर**–पु. मानससरोवर.
**देवहुति**–स्त्री. कर्दम ऋषीची पत्नी.
**देवा**–वि. ऋणकारी, देणेदार.
**देवार, देवाल**–वि. दाता, देणारा.
**देश**–पु. देश, एक राग, अवयव, स्थान, राजाच्या ताब्यांतील प्रदेश.
**देशज**–वि. संस्कृत अथवा अपभ्रंश नसलेले व प्रांतीय (शब्द).
**देशनिकाला**–पु. हद्दपार करण्याचीं सजा.
**देशी**–वि. देशाचे,देशासंबंधी,आपल्या देशांत तयार झालेले.–स्त्री. एक रागिणी.
**देशीय**–वि. स्वदेशी, देशांत तयार झालेलें.
**देस**–पु. देश.
**देसवाल**–वि. देशी.
**देसावर**–पु. विदेश, देशांतर.–वि. परदेशी.
**देह**–स्त्री. शरीर.
**देह छोड़ना**–मरणें.
**देहपात**–पु. मृत्यु.
**देहरा**–पु. देवालय, मानव शरीर.
**देहरी, देहली**–स्त्री. उंबरा, उंबरठा.
**देहा**–पु. देह, शरीर.
**देहात**–पु. खेडें, गांव. [ अडाणी.
**देहाती**–वि. ग्रामीण, खेड्यांत राहणारा,
**दैजा**–पु. हुंडा.
**दैत्य**–पु. राक्षस.
**दैन, दैनंदिन, दैनिक**–वि. रोजचें.
**दैनदार**–पु. देणेदार.
**दैनिक**–वि. दिवसाचें, प्रतिदिन होणारा, रोजचा, एक दिवसाचा पगार.
**दैयत**–पु. दैत्य, राक्षस.
**दैया**–पु. दैव.–अ. आश्चर्य किंवा दुःखोद्गार.
**दैव**–वि. देवासंबंधी, देवतेकडून होणारे. –पु. भाग्य, होणारी गोष्ट, विधाता.
**दैव बरसना**–पाऊस पडणें.
**दैव फटना**–गडगडाट होऊन पाऊस पडणें.
**दैवात्**–अ. अचानक, अकस्मात.
**दैवी**–वि. देवतासंबंधी, देवानें केलेली, नशिबानें होणारी, सात्विक.
**दैहिक**–वि. शारीरिक, शरीरापासून उत्पन्न.
**दैहौं**–क्रि. स. देईन.
**दो**–वि. दोन.
**दो चार होना**–भेट होणें.
**दो जीसे होना**–गर्भार होणें.
**दोई, दोउ, दोऊ**–वि. दोन्ही, दोघे.
**दोआब**–पु. दुआब, दोन नद्यांतील प्रदेश.
**दोकना**–क्रि. अ. गर्जणें.
**दोकला**–पु. दोन खटक्यांचें कुलुप.
**दोखना**–क्रि. स. दोष लावणें.
**दोगला**–पु. भिन्न जातीच्या आईबापा-

पासून उत्पन्न झालेला मनुष्य.
**दोगा**–पु. जाड पांघरूण, गिलावा, चुना.
**दोचंद**–वि. दुप्पट. [ दुःख, कष्ट.
**दोच**–स्त्री. बुचकळी, धाक, दटावणी,
**दोचना**–क्रि. स. भीड घालणें, दडपणें.
**दोचार**–स्त्री. दोन चार. [ चित्त.
**दोचित्ता**–वि. उद्विग्न चित्त, अस्थिर
**दोचित्ती**–स्त्री. उद्विग्नता.
**दोजख़**–पु. नर्क.
**दोज़ानू**–अ. गुडघे टेकून (बसणें).
**दोजिया**–वि. गर्भवती.
**दोझा**–पु. पुनर्विवाहित वर, पाटाचा नवरा.
**दोतरफ़ा**–वि. दुतर्फा, दोन्ही बाजूस.
**दोतल्ला**–वि. दुमजली. [–अ. दोन्हीकडे.
**दोन**–पु. दरी, दुआब, नद्यांचा संगम.
**दोना**–पु. द्रोण.
**दोनों**–वि. दोघेहि.
**दोपल्ली**–वि. दोन पदरी. –स्त्री. विशेष-
**दोपहर**–पु. दुपार.[प्रकारची घडीची टोपी.
**दोबारा**–अ. दुसऱ्यांदा.
**दोबाला**–वि. दुप्पट. [कुटिल, कपटी.
**दोमुँहा साँप**–पु. दुतोंडी साप, दुतोंड्या,
**दोय**–वि. दोन, दोन्ही.
**दोयम**–वि. दुय्यम, दुसरा. [ फसवणूक.
**दोरंगी**–स्त्री. दोन रंग असलेला, कपट,
**दोरसा**–पु. एक जातीचा ओढण्याचा तंबाखू, दोन जातीचा रस किंवा स्वाद
**दोरसे दिन**–गर्भारपणाचे दिवस. [असलेलें.
**दोराहा**–पु. दोन रस्ते फुटतात तें ठिकाण.
**दो[illegible]**–वि. दोन्ही बाजूंच्या, ज्याच्या दोन्ही बाजूस सारखे रंग आहेत असा, एक बाजस एका रंग व दुसऱ्या बाजूस दुसरा रंग असलेला.

**दोशंबा**–पु. सोमवार.
**दोश**–पु. खांदा. [ समानतेनें.
**दोशबदोश**–खांद्याला खांदा लावून,
**दोशीजा**–स्त्री. कुमारिका.
**दोष**–पु. अवगुण, उणेपणा, कलंक,
**दोषी**–वि. अपराधी, पापी. [ दूषण.
**दोस**–पु. दोष. [ पाळतात).
**दोसाद**–पु. एक जात (हे लोक डुक्कर
**दोसाला**–पु. शाल –वि. दोन वर्षांचा.
**दोसूती**–स्त्री. पाहा 'दुसूती'.
**दोस्त**–स्त्री. मित्र. [ व्यवहार.
**दोस्ताना**–पु. दोस्ती, मैत्री, मित्रत्वाचा
**दोस्ती**–स्त्री. मैत्री.
**दोह**–पु. शत्रुता, द्रोह.
**दोह(हि) ता**–पु. नातू.
**दोहती**–स्त्री. नात. [ थप्पड.
**दोहत्थड़**–पु. दोन्ही हातांनीं मारलेली
**दोहद**–स्त्री. गर्भावस्था, गर्भवतीची इच्छा, गर्भ. [ मानणें.
**दोहना**–क्रि. अ. दोषी ठरविणें, तुच्छ
**दोहनी, दोहिनी**–स्त्री. दुधाची चरवी.
**दोहर**–स्त्री. दोन पदरी चादर.
**दोहरा**–वि. दुहेरी, दुप्पट. [वृत्ति करणें.
**दोहराना**–क्रि. स. दुहेरी करणें, पुनरा-
**दोहला**–वि. दोन वेतें झालेली गाय.
**दोहा**–पु. हिंदीचा एक मात्रा वृत्त छंद.
**दोहाई**–स्त्री. पाहा 'दुहाई'.
**दोहाक, दोहाग**–पु. दुर्भाग्य.
**दौं**–अ. अथवा, किंवा, तर, कोणजाणें.
**दौंकना**–क्रि. अ. चमकणें, जोरानें बोलणें.
**दौंचना**–क्रि. स. पाहा 'दोचना'.
**दौंरी**–स्त्री. बैलांना बांधावयाची दोरी, मळणी, झुंड.

**दौड़**–स्त्री. धांव, वेग, आक्रमण, विस्तार, लांबी, बुद्धीची गति.
**(मनकी) दौड़**–कल्पना.
**दौड़ लगाना**–जोरानें धावणें.
**दौड़धूप**–स्त्री. प्रयत्न, परिश्रम.
**दौड़ना**–क्रि. अ. धांवणें, वेगानें चालणें, वाकणें, युक्ति करणें, प्रसरणें, व्यापणें.
**(चढ़) दौड़ना**–हल्ला चढविणें.
**दौड़ा (रा) जज**–पु. फिरता न्यायाधीश.
**दौड़ाक**–वि. धावणारा.
**दौड़ान**–स्त्री. धांव, धांवपळ.
**दौड़ाना**–क्रि. स. पळविणें, धावविणें, येजा करावयास लावणें, घिरटया घालावयास लावणें, पाठलाग करणें.
**दौड़ाहा**–पु. हलकारा, दूत.
**दौना**–पु. दवणा.
**दौर**–पु. भ्रमण.
**दौर दौरा**–पु. प्रबलता. [ कालचक्र.
**दौरा**–पु. प्रवास, फेरा, अभ्युदय काल,
**दौरान**–पु. भ्रमण, फेरा, पाळी, संचार.
**दौरी**–स्त्री. करंडी, लहान टोपली.
**दौलत**–स्त्री. संपत्ति. [ रार्थी).
**दौलतखाना**–पु. घर, निवासस्थान (आद-
**दौलतमंद**–वि. पैसेदार, श्रीमंत.
**द्युति**–स्त्री. चमक, शोभा किरण.
**द्यूत**–पु. जुगार.
**द्यौस**–पु. दिवस.
**द्रव**–वि. धावणारा, ओला, पातळ, मऊ. –पु. जाणें, पाझरणें, माघार, क्रीडा, वितळणें, पातळ पदार्थ, रस, काढा, वेग, मठ्ठा.
**द्रव्य**–वि. झाडाचें. –पु. वस्तु, मूलतत्त्व, योग्य वस्तु, संपत्ति, विनय, पैज, उटणें, औषध, मद्य, अर्क. [ किन्नर.
**द्रुम**–पु. वृक्ष, पारिजातक, वड, कुबेर,
**द्रोह**–पु. द्वेष, वैर, नुकसान, विश्वासघात,
**द्रोही**–पु. द्रोह करणारा. [ बंड.
**द्वंद्व**–पु. जोडी, भांडण, द्वंद्वयुद्ध, संशय,
**द्वापर**–पु. तिसरें युग. [ दुःख.
**द्वारा**–अ. मुळें, मार्गानें.
**द्विज**–पु. ब्राह्मण, पक्षी, चंद्रमा, सर्प. –वि. दोन वेळां जन्मलेला.
**द्विप**–पु. हत्ती, नागकेशर.
**द्विविद**–पु. पाहा 'दिविद'.
**द्वेष**–पु. शत्रुता, विरोध.
**द्वेषी**–वि. शत्रु, द्वेष करणारा.
**द्वैत**–पु. युग्म, भेदभाव. [दुसरें सांगणें.
**द्वैध**–पु. विरोध, मुख्य उद्देश्य लपवून

## [ ध ]

**धंका**–पु. धक्का, प्रहार, आघात.
**धंगर**–पु. गवळी, एक धारीदार कापड.
**धंधक, धंधरक**–पु. संसारांतील गुंतागुंत, जंजाळ, कामाचा देखावा, एक ढोल.
**धंधकधोरी**–पु. रात्रंदिवस कामांत गढलेला.
**धँधला**–पु. खोटे ढोंग.
**धंधलाना**–क्रि. अ. लटपट करणें.
**धंधा**–पु. धंदा, व्यवसाय, उद्योग.
**धंधार**–स्त्री. भारी दगड इत्यादि उचलण्यानें एक हत्यार.
**धंधाला**–स्त्री. कुट्टनी, कुंटिण. [ विणें.
**धँबना**–क्रि. स. भाता फुंकणें किंवा चाल-
**धँसना**–क्रि. अ. आंत दबणें, घुसणें, प्रवेश
**धँसान**–स्त्री. उतार, दलदल. [ करणें.
**धँसाना**–क्रि. स. नरम वस्तूंत घुसविणें, प्रवेश करविणें.

**बिल्ली के भागों छींका टूटना**–आयती संधी चालून येणें. [स्वच्छ कांच.
**बिल्लौर**–पु. स्फटिक, बिलोरी आरसा,
**बिल्लौरी**–वि. स्फटिकाचा. [गुंतवळ काढणें.
**बिवराना**–क्रि. स. केसांचा गुंता सोडविणें,
**बिवाई**–स्त्री. तळपायास चिरा पडणें, चिखल्या.
**बि(वि)वेक**–पु. सारासार विचार, खल, वाटाघाट, पृथक करणें, हौद, टांकी,
**बिषम**–वि. पाहा 'विषम.' [एकांत.
**बिषय**–पु. पाहा 'विषय.'
**बिषया**–स्त्री. वासना, विषयेच्छा.
**बि(वि)षयी**–पु. विषयासक्त, मदन, राजा, धनवान. [उत्साहभंग.
**बि(वि)षाद**–खेद, दुःख, निराशा, ग्लानि
**बिषान, बिषाण**–पु. शिंग, डुकराचा दांत,
**बिष्टा**–स्त्री. उदरमल, विष्टा. [हत्तीचा दांत.
**बिष्णु**–पु. पाहा 'विष्णु'.
**बिसंच**–पु. वस्तूंची निगा न ठेवणें, निष्काळजीपणा, कार्यनाश, भय.
**बिसंभर**–पु. विश्वंभर.–वि. बेसावध.
**बिसंभार**–वि. बेसावध.
**बिस, बिष**–पु. विष्णु.
**बिसखपरा**–पु, घोरपडीसारखा विषारी प्राणी, एक जंगली वनस्पति.
**बिसद**–वि. स्वच्छ, पांढरा, स्पष्ट, सुंदर,
**बिसन**–पु. व्यसन, खोड. [व्यक्त.
**बिसनी**–वि. व्यसनी, शोकीन.
**बिसम**–पु. पाहा 'विषम.
**बिसमऊ**–पु. आश्चर्य.
**बिसमय**–पु. आश्चर्य, अभिमान, संदेह.
**बिसमित**–वि. आश्चर्य चकित.
**बिसमिल**–वि. घायाळ, जखमी.
**बिसमिल्ला**–पु. ईश्वराच्या नांवानें (प्रत्येक कार्यारंभीं मुसलमान लोक याचा उच्चार करितात).
**बिसयक**–पु. प्रदेश, संस्थान.
**बिसरना**–क्रि. स. विसरणें.
**बिसरात**–पु. खेचर.
**बिसराना**–क्रि. स. विसरणें.
**बिसवासी**–वि. विश्वास ठेवणारा, विश्वासू.
**बिससना**–क्रि. स. विश्वास ठेवणें, वध करणें, शरीराचे तुकडे तुकडे करणें.
**बिसहना**–क्रि स. विकत घेणें, जाणून बुजून आपल्या बरोबर घेणें.
**बिसहर**–पु. विषारी साप.
**बिसाँयंध**–वि. सडलेल्या माशाचा दुर्गंध असलेले. –स्त्री. सडलेल्या मांसाचा
**बिसाख**–पु. विशाखा नक्षत्र. [दुर्गंध.
**बिसात**–स्त्री. अंथरण्याची वस्तु, बुद्धिबळ, सामर्थ्य, दर्जा, जमा, दौलत.
**बिसातबान, बिसाती**–पु. स्टेशनरी माल विकणारा व्यापारी.
**बिसाना**–क्रि. अ. विषाचा प्रभाव पडणें,
**बिसारा**–वि. विषारी. [उपाय चालणें.
**बिसाला**–वि. विशाल.
**बिसास, बिश्वास**–पु. विश्वास.
**बिसासी**–वि. अविश्वासू, दगाबाज, कपटी.
**बिसासिन**–स्त्री. जिच्यावर विश्वास करतां येत नाहीं अशी स्त्री.
**बिसाहना**–क्रि. स. खरेदी करणें, विकत घेणें.–पु. विकत घेतलेली वस्तु, खरेदी.
**बिसाहनी**–स्त्री. सौदा, खरेदी केलेली वस्तु.
**बिसाहा**–पु. सौदा.
**बिसिख**–पु. बाण.
**बिसियर**–वि. विषारी.

**बिसियार**–वि. फार, ढीग, जास्त.
**बिसुद्ध, बिशुद्ध**–वि. निर्मळ, शुद्ध.
**बिसूरना**–क्रि. अ. खेद करणें.–स्त्री. चिंता, [काळजी.
**बिसेख, विशेष**–वि. विशेष.
**बिसेखता**–स्त्री. विशेषता.
**बिसेखना**–क्रि.अ. विस्तारपूर्वक वर्णन करणें, [निर्णय करणें.
**बिसेसर**–पु. विश्वेश्वर.
**बिसोक**–पु. शोकरहित, अत्यंत शोक.
**बिस्तर**–पु. बिछाना, अंथरूण, फैलाव, विस्तार, बोलण्याचा पाल्हाळ, प्रार्थना, प्रणय, आधार, आसन, समूह, वैपुल्य.
**बिस्तरना**–क्रि. स. विस्तार करणें, फैलावणें. [–क्रि. अ. फैलणें.
**बिस्तुइया**–स्त्री. पाल.
**बिस्राम, विश्राम**–पु. आराम, विश्राम.
**बिस्व**–पु. विश्व.
**बिस्वरूप, विश्वरूप**–पु. विराट भगवान, विष्णु, अगरूचंदन.–वि. अनेक रूपाचे.
**बिस्वा**–पु. एक बिघा जमिनीचा विसावा [भाग.
**(उन्नीस) बिस्वा**–नव्याण्णव टक्के.
**(बीस) बिस्वा**—शंभर नंबरी, निःसंशय.
**बिस्वामित्र**–पु. विश्वामित्र.
**बि (वि) स्वास**–पु. विश्वास, भरंवसा, गुह्य.
**बिहंग, विहंग**–पु. पक्षी, ढग, बाण, सूर्य, चंद्र.–वि. आकाशवाणी.
**बिहंडना**–क्रि. स. तुकडे तुकडे करणें, नष्ट [करणें.
**बिहँसना**–क्रि. अ. हंसणें.
**बिहँसाना**–क्रि. अ. मंदस्मित करणें, प्रफुल्लित होणें, फुलणें, खिलणें.–क्रि. स. हंसविणें, खुष करणें.
**बिहद्द**–वि. बेहद्द, अपरिमित.
**बिहबल, विह्वल**–वि. व्याकुळ, बेचैन.
**बिहरना**–क्रि. अ. सहल करणें, फिरणें. –क्रि. स. फाटणें, फुटणें, सुटणें.
**बिहराना**–क्रि. स. फाडणें.
**बिहाई, बिहाय**–अ. विसरून, सोडून.
**बिहान**–पु. सकाळ, उद्यां.
**बिहाना**–क्रि. स. सोडणें, त्यागणें.–क्रि. अ. कंठणें, व्यतीत करणें.
**बिहार**–पु. पाहा 'विहार'. [खेळणें
**बिहारना**–क्रि.अ. विहार करणें, क्रीडा करणें,
**बि (वि) हारी**–खेळणारा, आनंद करणारा, सुंदर. [असलेला.
**बिहाल**–वि. अस्वस्थ, हलाखीच्या स्थितींत
**बिहित**–अ. पाहा 'विहित'.
**बिहिश्त, बहिश्त**–पु. स्वर्ग.
**बिही**–स्त्री. पेरू सारखें एक फळ.
**बिहीदाना**–पु. मोगली बेदाणा.
**बि (वि) हीन**–वि. विहीन, रहित, अति नीच.
**बिहु (हो) रना**–क्रि. अ. सुटणें, वियोग होणें.
**बीं**–वि. पाहाणारा (समासांत, जसें–बारीक-बीं–सूक्ष्म वस्तु पाहाणारा).
**बींडा**–पु. मोळी, पेंढी, सुरळी.
**बींडी**–स्त्री. मोळी, पेंढी.
**बींधना**–क्रि. अ. गुंतणें.–क्रि. स. विद्ध [करणें, छेदणें.
**बी**–स्त्री. महिला.
**बीका**–वि. वांकडा.
**बीख**–पु. पाऊल.
**बीग**–पु. लांडगा.
**बीगना**–क्रि. स. विखुरणें, पसरणें, फेकणें.
**बीघा**–पु. बिघा. [आंत.–स्त्री. लाट.
**बीच**–पु. मध्यभाग, अंतर, संधि.–अ.
**बीच करना**–मध्यस्थी करणें.
**बीच खेत**–मैदानांत, सर्वांसमक्ष.
**बीच पड़ना**–मध्यस्त होणें.
**बीच बीच में**–मधून मधून.
**बीच में कूदना**–मध्यें घुसणें, बोडें दामटणें,

**बीच में पड़ना**–पंच बनणें.

**बीच में रखना**–साक्षी ठेवणे.

**बीच रखना**–भेदभाव मानणे, परका [समजणें.

**बीच बचाव**–मध्यस्थता.

**बी(वी)चि-ची**–स्त्री. लाट, चंचलता, फुरसत, अवकाश, आनंद, किरण, सुख.

**बीचु**–पु. संधि, अवसर, फरक.

**बीचोबीच**–अ. मधोमध.

**बीछना**–क्रि. स. निवडणे.

**बीछी**–स्त्री. विंचू.

**बीछू**–पु. विंचू, एकप्रकारची सुरी.

**बीज**–पु. धान्य, नाटक इ. चे मूळ, बी, वीर्य, मुख्य कारण, मूळ कारण, बीजगणित सत्य, स्थान, आधार मंत्रातील भाग, तत्त्व.– स्त्री. वीज.

**बीजक**–पु बहुबीज फळ, मालाची किंमत, माहिती वगैरेची यादी, कबीराचा एक पद्य संग्रह, गाडलेल्या संपत्तीची त्या संपत्तीबरोबरच गाडलेली यादी.

**बीजन**–पु. पंखा.

**बीजपूर**–पु ईडलिंबू.

**बीजबंद**–पु चिकण्याचे बी.

**बीजा**–वि दुसरा.

**बीजी**–स्त्री कोय, गीर

**बीजु, बीजुरी**–स्त्री. वीज.

**बीझ**–वि. सुने, एकांत.

**बीझना**–क्रि. अ. अडकणे, लपेटणे.

**बीट**–स्त्री. पक्ष्याची विष्ठा.

**बीड़**–स्त्री. चळत (रुपयाची).

**बीड़ा**–पु. विडा, तांबूल.

**बीड़ा उठाना**–विडा उचलणें, काम करण्यास तयार होणे.

**बीड़ा डालना**–आव्हान करणे.

**बीड़ी**–स्त्री. बिडी, विडा, चळत, दांतवण.

**बीतना**–क्रि. अ. व्यतीत होणें, गुजरणें, संघटित होणें.

**बीथि, बीथि-थी**–स्त्री. मार्ग, सडक, ओळ, पंक्ति, जिना, पाय-या, बाजार, दुकान, देवडी, रासें, रूपकभेद.

**बीथित**–वि. व्यथित, दुःखी.

**बीधना**–क्रि. अ. अडकविणे.–क्रि. स. छेदणें.

**बीन**–स्त्री. वीणा, बीन.

**बीनकल**–पु. बीन वाजविणारा. [विणणें.

**बीनना**–क्रि. स. वेचणें, निवडणें, छेदणें,

**बीनाई**–स्त्री. दृष्टी, पाहाण्याची शक्ति.

**बीनी**–स्त्री. नाक.

**बीफे**–पु. गुरुवार.

**बीबी, बीवी**–स्त्री. पत्नी, बायको, कुलवधु, स्त्रियासाठी आदर सूचक शब्द.

**बीमा**–पु विमा, विमा उतरविलेलें पत्र किंवा पार्सल.

**बीमार**–वि. रोगी, आजारी [करणारा.

**बीमारदार**–वि. रोग्याची सेवा शुश्रुषा

**बीमारदारी**–स्त्री. रोग्याची सेवाशुश्रुषा,

**बीमार-पुरसी**–आजाऱ्याच्या समाचारास जाणें. [भानगड, बखेडा.

**बीमारी**–स्त्री आजार, रोग, वाईट संवय,

**बीय-या**–पु. बी, बीज.–वि. दुसरा, दोन, जोडी [कुरण, विडा, बीर.

**बीर**–पु. भाऊ.–स्त्री. मैत्रीण, एक दागिना,

**बीरज**–पु. वीर्य, शक्ति, बीज.

**बीरन**–पु भाऊ. [गाय.

**बीरबहूटी**–स्त्री. पावसाळी किडा, गोगलगाय.

**बीरभद्र**–पु. शंकराच्या मुख्य गणाचें नांव.

**बीरा**–पु. देवाचा प्रसाद, कुरण. [सन.

**बी(वी)रासन**–पु. तपस्व्याचे आसन, वीरा-

**बीरी**–स्त्री. विडा, कानांतील दागिना.
**बीस**–वि. वीस, उत्तम, श्रेष्ठ.
**बीस विसवा, बीस विस्वे**–अ. हजार हिश्शानें, संभवतः –वि. श्रेष्ठ, उत्तम.
**बीसी**–स्त्री. विसांचा गट, कोडी, धान्याचें माप.
**बीसों**–वि. कितीतरी, वीसही.
**बीह्**–वि. वीस.
**बीहड़**–वि. उंचसखल, खडबडीत, बिकट, अवघड. –वि. अलग.
**बुंजाही**–पु. जातिविशेष. –वि. थोडा.
**बुंद**–पु. बिंदु, थेंब, वीर्य, टोप. –पु. तीर.
**बुंदकी**–स्त्री. टिकली, लहान ठिपका, डाग.
**बुंदा**–पु. कानांत घालावयाचा दागिना (डूल, लोलक इ.), कपाळाची टिकली.
**बुंदिया**–स्त्री. थेंब, बुंदी (पकवान्न).
**बुंदेला**–पु. बुंदेलखंडांत राहाणारा, एक क्षत्रिय जात.
**बुंदौरी**– स्त्री. बुंदी.
**बुआ**–स्त्री. आत्या.
**बुकचा**–पु. गाठोडें.
**बुकची**–स्त्री. पोटळी, सुई, दोरा वगैरे ठेवण्याची शिप्याची पिशवी.
**बुकनी**–स्त्री. पूड, चूर्ण.
**बुकुन**–पु. भुकटी, बुकणी, पाचक चूर्ण.
**बुक्का**–पु. अभ्रकाची पूड, बुकणी.
**बुक्कार**–स्त्री. सिंहगर्जना.
**बुख़ार**–पु. ज्वर, ताप, वाफ, आवेग (शोक, क्रोध, इत्यादींचा).
**बुख़ारात**–'बुखार'चें अ. वचन, वाफ.
**बुख़्ल**–स्त्री. हृदयाची संकीर्णता, कृपणता.
**बुग़दा**–पु. एक प्रकारचा मोठा सुरा.
**बुग्ज़**–पु. गुप्त शत्रुत्व, मनांतला द्वेष.
**बुज़**–स्त्री. शेळी, बकरी.
**बुज़दिल**–वि. भित्रा, भेकड.
**बुज़दिली**–स्त्री. भ्याडपणा, भित्रेपणा.
**बुज़ुर्ग**–वि. वडील, वृद्ध, श्रेष्ठ.
**बुज़ुर्गवार**–वि. श्रेष्ठ, वडीलधारीं.
**बुज़ुर्गी**–स्त्री. वडीलकी, मोठेपणा.
**बुझना**–क्रि. अ. विझणें, मंदावणें, थंड पडणें.
**बुझाई**–स्त्री. विझवण्याचें काम.
**बुझाना, बुझावना**–क्रि. स. विझविणें, शांत करणें, समजाविणें.
**(ज़हरसे) बुझाना**–विषाचें पाणी चढविणें.
**बुझौवल**–स्त्री. कोडें.
**बुड़की**–स्त्री. पाण्यांत मारलेली बुडी, बुडकी.
**बुड़बुड़ाना**–क्रि. अ. पुटपुटणें, कुरकुरणें.
**बुड़ाना**–क्रि. स. बुडविणें.
**बुड्ढा**–वि. म्हातारा.
**बुढ़भस**–पु. म्हातारचळ.
**बुढ़वा-मंगल**—पु. एक सण.
**बुढ़ाई–बुढ़ौती**–स्त्री. म्हातारपण.
**बुढ़ाना**–क्रि. अ. म्हातारपण येणें, वृद्ध होणें.
**बुढ़ापा**–पु. म्हातारपण.
**बुत**–पु. मूर्ति, प्रेमिका.–वि. घुम्या.
**बुतकदा**–पु. देऊळ, प्रेमिकेचें निवास स्थान.
**बुतख़ाना**–पु. मंदिर, प्रेमिकेचें निवास-स्थान.
**बुतपरस्त**–पु. मूर्तिपूजक.
**बुतपरस्ती**–स्त्री. मूर्तिपूजा.
**बुतशिकन**–वि. मूर्तिभंजक.
**बुतान**–पु. 'बुत'चें अ. वचन.
**बुताना, बुतावना**–क्रि. अ. विझणें.–क्रि. स. विझविणें.
**बुताम**–पु. बटण.
**बुत्ता**–पु. फसवणूक, लबाडी, बहाणा, ढोंग, आव.
**बुत्ता देना**–फसविणें, गुंगारा देणें.
**बुध**–पु. विद्वान, देव, एक ग्रह.
**बुद्ध**–वि. जाणलेलें, शहाणा, विकसित.–पु. विद्वान, गौतम बुद्ध, बौधावतार,

पूर्ण ज्ञानी, परमात्मा.
**बुधि, बुद्धि**–स्त्री. जाणणें, मति, ज्ञानशक्ति, विवेक, विचार, कल्पना, समजूत, जाणीव, हेतु, शुद्धिवर येणें, युक्ति, प्रकृति, निश्चयरूप अंतःकरण वृत्ति.
**बुद्धिमानी**–स्त्री. चतुराई, बुद्धिमत्ता.
**बुद्धू**–बावळट, मूर्ख.
**बुन**–पु. कॉफीचें बी, झाडाचें मूळ.
**बुनना**–क्रि. स. विणणें.
**बुनाई**–स्त्री. विणकाम, विणण्याची मजुरी.
**बुनावट**–स्त्री. वीण. [वास्तविकता.
**बुनियाद**–स्त्री. पाया, मूळ, अस्सलपणा,
**बुबुकना**–क्रि. अ. ओकसाबोकशीं रडणें, हंबरडा फोडणें.
**बुबुकारी**–स्त्री. मोठ्यानें रडणें, हंबरडा.
**बुयाम**–पु. चिनी मातीची बरणी.
**बुरकना**–क्रि. स. भुरभुरणें, हलक्या हातानें थोडी थोडी पसरणें. (पूड वगैरे).
**बुरक़ा, बुर्क़ा**–पु. बुरखा.
**बुरा**–वि. वाईट, निकृष्ट. [घेणें, द्वेष करणें.
**बुरा मानना**–वाईट वाटणें, मनाला लावून
**बुरा भला**–तोंडास येईल तें, हानिलाभ, शिवीगाळ.
**बुराई**–स्त्री. वाईटपणा, दोष, दुर्गुण, निंदा.
**बुराक़**–पु. महम्मद साहेबांचा एक घोडा.
**बुरादा**–पु. लांकडाचा भुसा, चूर्ण, चुरा.
**बुरुश**–पु. ब्रश.
**बुर्क़ा**–पु. बुरखा.
**बुर्ज**–पु. बुरूज, घुमट, रास (ज्योतिष शास्त्रांत). [बळांतील).
**बुर्द**–स्त्री. वरची प्राप्ति, पैज, बुर्जी (बुद्धि-
**बुर्द होना**–क्रि. अ. काम बिघडणें.
**बुर्दबार**–वि. सहनशील, सुशील.

**बुलंद**–वि. उंच, श्रेष्ठ.
**बुलबुल**–स्त्री. एक पक्षी (बुलबुल).
**बुलबुला**–पु. बुडबुडा.
**बुलहवस**–वि. लोभी, इच्छिणारा.
**बुलाक़**–स्त्री. लोलक. [बोलावयास लावणें.
**बुलाना**–क्रि. स. बोलाविणें, हांक मारणें,
**बुलावा**–पु. निमंत्रण, बोलावणें.
**बुलूग़**–पु. सज्ञान अवस्था, जवानी, तारुण्य.
**बुल्ला**–पु. बुडबुडा.
**बुहनी**–स्त्री. बोहणी.
**बुहारना**–क्रि. स. झाडणें, केर काढणें.
**बुहारी**–स्त्री. झाडू, केरसुणी.
**बूँद**–स्त्री. थेंब, बिंदु. [येणें.
**बूँदें गिरना अथवा पड़ना**–पावसाचे थेंब
**बूँदाबांदी**–स्त्री. पावसाची बुरबुर.
**बूँदी**–स्त्री. बुंदी पक्वान्न, पावसाचे थेंब.
**बू**–स्त्री. **बास, गंध**, दुर्गंध, घाण.
**बूआ**–स्त्री. आत्या. [उसनी ऐट आणणें.
**बूकना**–क्रि. स. पूड करणें बोलण्यांत
**बूचड़**–पु. कसाई, खाटीक.
**बूचड़खाना**–पु. कसाईखाना.
**बूचा**–वि. कान कापलेला, विद्रूप, बुच्चा.
**बूजना**–क्रि. स. धोका देणें, फसविणें.
**बूझ**–स्त्री. अक्कल, बुद्धि, ज्ञान, कोडें.
**बूझना**–क्रि. स. जाणणें, समजणें विचारणें.
**बूट**–पु. टहाळा (हरभऱ्याचा), हरभऱ्याचा दाणा, घाटा, झाड.
**बूटनि**–स्त्री. मखमली किडा.
**बूटा**–पु. रोपटें, वेलबुट्टी.
**बूटी**–स्त्री. वनस्पती, वेलबुट्टी, भांग, पत्त्या-
**बूड़**–पु. बुडण्याची क्रिया. [वरील ठिपके.
**बूड़ना**–क्रि. स. बुडणें, निमग्न होणें. [किडा.
**बूढ़**–वि. म्हातारा.–पु. लालरंग, पावसाळी

बूढ़ा–पु. म्हातारा.
बूता–पु. शक्ति, पराक्रम.
बूदोबाश–स्त्री. निवास, राहणें.
बूम–पु. घुबड, जमीन.
बूर–पु. भुसा.
बूर के लड्डू–दगा, भुशाचे लाडू.
बूरा–पु. पिठी साखर, पूड, चूर्ण. [उपरणें.
बृहती–स्त्री. रिंगणी, विश्वासू वीणा,
बृंद, वृंद–पु. समूह, केळीचा घड, १०० कोटी संख्या. [अधिक, सन्मान्य.
बृं (वृं) दारक–पु. देव. –वि. सुंदर, उत्तम
बृक, वृक–लांडगा, कोल्हा, कावळा, क्षत्रिय, उंदीर, घुबड, अनेक पदार्थांचे धूप.
बृत्तान्त–पु. समाचार पाहा, 'वृत्तांत.'
बृत्ति–पाहा 'वृत्ति'.
बृथा, वृथा–अ. व्यर्थ, निष्कारण, चुकीनें,
बेंग–पु. बेडूक. [विधि विरुद्ध, मूर्खपणानें.
बेंट-ठ–स्त्री. लांकडी मूठ, दस्ता.
बेंडा–वि. तिरपा, वांकडा, गुतागुंतीचा.
बेंडी–स्त्री. ओकती (पाणी काढण्याची).
बेंत–पु. वेत, वेताची छडी.
बेंत की तरह कांपना–थरथर कांपणें.
बेंतनीति–स्त्री. संधिसाधुवृत्ति.
बेंदा–पु. टिळा, टिकली, बिंदी.
बेंदी–स्त्री. टिळा, बिंदी, शून्य.
बेंवड़ा–पु. अडसर. [लहानासाठीं संबोधन.
बे–अ. विना, खेरीज, निषेध सूचक उपसर्ग,
बेअकल–वि. बेअकली, मूर्ख.
बेअदब–वि. मोठ्यांचा मान न करणारा.
बेअसल–वि. निराधार.
बेआब–वि. निस्तेज, तुच्छ.
बेआबरू–वि. अपमानित अप्रतिष्ठित.
बेइज्जत–वि. अमर्याद.
बेईमान–वि. अधर्मी, अनाचारी.
बेउज्र–वि. आक्षेपरहित, बिनहरकत.
बेकदर–वि. अब्रू नसलेला, अप्रतिष्ठित.
बेकरार–वि. बेचैन, अस्वस्थ.
बेकल–वि. विकल, अस्वस्थ.
बेकली–स्त्री. व्याकुळता.
बेकस–वि. दीन, गरीब, अनाथ.
बेकसूर–वि. निरपराध, निर्दोष. [उच्छृंखल.
बेकहा–वि. दुसऱ्याचें न ऐकणारा, उद्धट,
बेकाबू–वि. लाचार, ताब्यांत नसलेला.
बेकाम–वि. निरुपयोगी, कुचकामाचा,
बेकायदा–वि. नियमाविरुद्ध. [निरुद्योगी.
बेकार–वि. निकामी, निरुपयोगी, निष्फळ.
बेख–पु. वेष, सोंग. [–अ. व्यर्थ.
बेखटक–वि. निःसंकोच. [बेलाशक.
बेखटके–अ. निःसंकोचपणें, बेधडक,
बेखतर–वि. निर्भय, धीट.
बेखता–वि. निर्दोष, निरपराध.
बेखबर–वि. निष्काळजी, बेशुद्ध, अजाणता.
बेखुद–वि. बेहोश, भानरहित.
बेखौफ–वि. धीट, निर्भय.
बेग, वेग–पु. वेग, प्रवाह, त्वरा, जोराची गति, सपाटा, आवेश, जोर, परिणाम, प्रभाव, उत्साह, अविकार, घाई, अविचार, प्रेम, आनंद, मलमूत्रोत्सर्गेच्छा, वीर.
बेगम–स्त्री. राणी, उच्च कुळांतील स्त्री.
बेगर–पु. लोणच्यांत मिसळलेला मसाला. –अ. वेगळा, शिवाय.
बेगरज–वि. तमा न बाळगणारा, बेफिकीर.
बेगाना–वि. परका, अपरिचित, दुसऱ्याचा.
बेगार–स्त्री. बिगार, वेठ, मनापासून न केलेलें काम, बेगार.

**बेगार टालना**–कसें तरी काम उरकणें.
**(बैठे से) बेगार भली**–निरुद्योगीपणापेक्षां फुकट कां होईना पण काम करणें बरें.
**बेगारी**–स्त्री. बिगारी, बेगारी.
**बेगि**–अ. तत्काळ, लवकर, बेगी.
**बेगुनाह**–वि. निरपराधी, निर्दोष, बेगुन्हा.
**बेचना**–क्रि. स. विकणें, बेचणें.
**बेच खाना**–गमावणें, हरवणें.
**बेचवाना, बेचाना**–क्रि. स. विकविणें.
**बेचारा**–वि. बिचारा, दीन, गरीब.
**बेचैन**–वि. व्याकुळ, बेचैन.
**बेजड़**–वि. निराधार, बिन बुडाचा, पाया नसलेला. [दीन दुबळा.
**बेजबान**–वि. मुका, बोलतां न येणारा,
**बेजा**–वि. अवेळीं झालेला, अनुचित, अयोग्य. [ दुबळा, अशक्त.
**बेजान**–वि. निर्जीव, मृतवत्, कोमेजलेला,
**बेजाब्ता**–वि. बेकायदा, नियमाविरुद्ध.
**बेजार**–वि. नाखुष, अप्रसन्न, दुःखी.
**बेजू**–पु. मुंगूस, विजू.
**बेजोड़**–वि. अद्वितीय, जोड नसलेलें.
**बेझर–रा**–पु. सालू.
**बेझा**–पु. लक्ष, निशाण. ठिपके [असतात.
**बेट**-पु. बदक, चोंचीखालीं दोन पांढरे ठिपके
**बेटला**–पु. मुलगा, पुत्र.
**बेटली**–स्त्री. मुलगी.
**बेटवा**–पु. मुलगा.
**बेटा, बेटौना**–पु. मुलगा, पुत्र.
**बेटी, बेटौनी**–स्त्री. मुलगी, कन्या.
**बेठन**–पु. वेष्टनाचें वस्त्र.
**बेठिकाने**–वि. स्थानभ्रष्ट, व्यर्थ, निरर्थक.
**बेड़**–पु. कुंपण, खालचा भाग, बिछाना.
**बेड़ा**–पु. जहाजांचा किंवा नावांचा तांडा, आरमार, नाव.–वि. कठिण.
**बेड़ा पार करना या लगाना**–उद्धार करणें, विपत्तींतून वांचविणें.
**बेड़िन, बेड़िनी**–स्त्री. नट जातीची स्त्री.
**बेड़िया**–पु. नटांची जात. [लहान नाव.
**बेड़ी**–स्त्री. बेडी, एक प्रकारची टोपली,
**बेडौल**–वि. कुरूप.
**बेढंग**–वि. बेडौल, बेढब, कुरूप.
**बेढंगा**–वि. अशिष्ठ, अव्यवस्थित ठेवलेला,
**बेढ**–पु. नाश, बरबादी. [ कुरूप.
**बेढई**–स्त्री. कचोरी.
**बेढना**–क्रि. स. कुंपण घालणें, गुरें वळणें.
**बेढब**–वि. बेडौल, विजोड, कुरूप.–अ. वाईट रितीनें.
**बेढा**–पु. हातांतील कडें, परस, परसू.
**बेतकल्लुफ**–वि. मन मोकळा, निःसंकोची,–अ. निःसंकोच, बेधडक.
**बेतना**–क्रि. अ. माहीत होणें, कळणें.
**बेतमीज**–वि. असभ्य.
**बेतरह**–अ. अनुचितरूपानें, गैर वाजवी, असाधारणरित्या.–वि. पुष्कळ, अधिक.
**बेतरीका**–अ. अनुचित, नियमाविरुद्ध.
**बेतस**–पु. वेत.
**बेतहाशा**–अ. अत्यंत वेगानें, भरधांव, गर्भगळीत होऊन, अविचारानें.
**बेताब**–वि. दुर्बल, व्याकुळ.
**बेतार**–वि. बिनतारी.
**बेतार का तार**–बिनतारी संदेश.
**बेताल**–पु. भाट, वेताळ. [ मक
**बेतुका**–वि. विजोड, विसंगत, बेढब, निर्थ-
**बेद**–पु. पाहा 'वेद.' [अधिकारच्युत
**बेदखल**-वि. ताबा किंवा अधिकार नसलेला,
**बेदखली**–स्त्री. संपत्तीवरील मालकी हक्क

नाहींसा होणें.

**बेदम**–वि. मृतवत्, मरणोन्मुख, जर्जर.

**बेदर्द**–वि. निर्दय, कठोर.

**बेदाग़**–वि. न डागळलेला, स्वच्छ, निर्दोषी

**बेदाना**–पु. उत्तम काबुली डाळिंब, दारू-हळद.–वि. मूर्ख, बेवकूफ.

**बेदार**–वि. जागृत.

**बेदिक, बेदि**–पु. पाहा 'वेदि.'

**बेध, वेध**–पु. छिद्र पाडणें, उंची (माप), खोली, ग्रहांचें स्थान, ग्रहण, तिथि इ. चा निर्णय.

**बेधड़क**–अ. निःसंकोच, बेधडक, मागचा पुढचा विचार न करतां, वि. निःसंकोची, निर्भय.

**बेधना**–क्रि. स. टोंचणें, भोंक पाडणें.

**बेधिया**–पु. अंकुश.

**बेन**–पु. बांसरी, मुरली, पुंगी.

**बेनज़ीर**–वि. अजोड, अनुपम.

**बेनबा**–पु. वाळ्याचा पंखा.–वि. दरिद्री.

**बेनसीब**–वि. अभागी, दुर्दैवी.

**बेना**–पु. वाळ्याचा पंखा, वाळा, बांबू.

**बेनागा**–अ. सतत.

**बेनिमून**–वि. अनुपम, अद्वितीय.

**बेनियाज़**–वि. स्वतंत्र, बेफिकीर.

**बेनी**–स्त्री. वेणी, त्रिवेणी, दाराची खिटी.

**बेनु**–पु. बांसरी, मुरली, बांबू, एक राजा.

**बेपरद, बेपर्द**–वि. आवरण नसलेला, उघडा, नग्न.

**बेपरवाह**–वि. निष्काळजी, बेपर्वा, उदार.

**बेपाइ**–वि. भांबावलेला, घाबरलेला.

**बेपीर**–वि. निष्ठुर, निर्दय.

**बेपेंदी**–वि. बिनबुडाचा.

**बेपेंदी का लोटा**–हलक्या कानाचा, घटकेंत विचार बदलणारा.

**बेफ़ायदा**–अ. व्यर्थ, उगीच.

**बेफ़िक्र**–वि. बेफिकीर.

**बेबस**–वि. लाचार, पराधीन.

**बेबहा**–वि. अमूल्य.

**बेबाक़**–वि. फेडलेलें (ऋण), निर्भय.

**बेभाव**–अ. बेहद्.

**बेमहल**–वि. अयोग्य वेळीं.

**बेमिस्ल**–वि. अद्वितिय.

**बेमौका**–वि. अयोग्य वेळीं, अवेळींचा. –पु. अयोग्य. [उशीर, विलंब.

**बेर**–स्त्रि. बोर, बोरीचें झाड, वेळ, खेप,

**बेर जरी**–स्त्री. जंगली बोर.

**बेर बेर**–अ. वारंवार.

**बेरहम**–वि. निष्ठुर, निर्दयी. [नोकर.

**बेरा**–पु. वेळ, सकाळ, घरांत काम करणारा

**बेरियाँ**–स्त्री. वेळ, समय.

**बेरी**–स्त्री. बोर, मुठभर अन्न.

**बेरुख़**–वि. बेमुर्वतखोर, प्रसंगी उपयोगी न पडणारा, नाखुष, रागावलेला.

**बेरे, बेड़े**–पु. नावांचा समूह.

**बेरोक**–वि. निर्विघ्न, अडथळ्याशिवाय.

**बेल**–पु. फावडें, कुदळ, सडक मोजतांना चुन्याची ओढलेली रेघ, गांठ (कापड, कागद इ. ची) बेलाचें झाड, बेलफळ.–स्त्री. वेल, लता, संतान, वंश, भिंतीवर अगर कपड्यावर काढलेलीं फुलें, वेलबुट्टी, वल्हें.

**बेल मुँढे चढ़ना**–कार्य तडीस जाणें.

**बेलचा**–पु. कुदळ.

**बेलज़्ज़त**–वि. बेचव, आनंदरहित. [मजूर.

**बेलदार**–पु. पावड्यानें काम करणारा

**बेलन**–पु. सडक किंवा जागा सपाट

करण्याचा दगडी किंवा लोखंडी रोलर, यंत्रांतील रोलर, पिंजाऱ्याचें लाटणें, गुऱ्हाळाचा ओंडका. [करणें.
**बेलना**–पु. लाटणें.–क्रि. स. लाटणें, नष्ट
**पापड़ बेलना**–कार्यनाश करणें.
**बेलबूटा**–पु. वेलबुट्टी.
**बेलरी-ड़ी**–स्त्री. लता, वल्लरी.
**बेलसना**–क्रि. स. उपभोगणें.
**बेलहरा**–पु. विड्याचा डबा.
**बेला**–पु. मोगरा, समय, वेळ.
**बेलाग**–वि. साफ, बिलकुल, अगदीं.
**बेलि**–स्त्री. लता, वेली.
**बेली**–पु. सहचर, साथीदार.
**बेलौस**–वि. स्पष्टवक्ता, निःस्वार्थ.
**बेवक़ूफ़**–वि. मूर्ख, नालायक.
**बेवक़्त**–अ. अवेळीं.
**बेवफ़ा**–वि. बेमुर्वतखोर, कृतघ्न.
**बेवरा,ब्योरा**–पु. विवरण.
**बेवरेवार**–वि. तपशीलवार, विस्तृत.
**बेवसाय,व्यवसाय**–पु.धंदा,उद्योग, व्यवसाय.
**बेवहरना**–क्रि. अ. व्यवहार करणें, वागणें,
**बेवहार**–पु. व्यवहार. [सावकारी करणें.
**बेवहरिया**–पु. सावकार, सावकाराचा
**बेवा**–स्त्री. विधवा, मृतपतिका. [कारकून.
**बेवान**–पु. विमान.
**बेश**–वि. अधिक, ज्यादा, श्रेष्ठ, सुंदर.
**बेशऊर**–वि. मूर्ख.
**बेशक**–अ. निःसंदेह, निःसंशय.
**बेश कीमत**–वि. मौल्यवान.
**बेशी**–स्त्री. अधिकता.
**बेशुमार**–वि. बेसुमार, अमर्याद.
**बेसंदर, वैश्वानर**–पु. आग.
**बेसँभर**–वि. मूर्च्छित, बेशुद्ध.
**बेस, बेश**–पु. वेश, प्रवेश, संचार, वेश्यास्थान, वेश्याजन, पोशाख, वेष (सोंग) तंबू, वेश्यावेतन.
**बेसन**–पु. डाळीचें पीठ.
**बेसनी**–स्त्री. डाळीच्या पिठाची बनविलेली पुरी, खारी पुरी.
**बेसनौटी**–स्त्री. खारी पुरी.
**बेसबरा**–वि. अधीर, उतावीळ, असंतुष्ट.
**बेसर**–पु. खेचर, नथ.
**बेसरा**–वि. निराश्रित.
**बेसरोसामान**–वि. कंगाल.
**बेसवा**–स्त्री. वेश्या.
**बेसा**–स्त्री. वेश्या. –पु. वेष, पोषाख.
**बेसारा**–वि. बसणारा, स्थापणारा.
**बेसाह-हा**–स्त्री. खरेदी केलेली वस्तु, सौदा.
**बेसाहना**–क्रि. अ. विकत घेणें, खरेदी करणें, ओढवून घेणें, (विरोध, संकट इ.).
**बेसाहनी**–स्त्री. मालाची खरेदी.
**बेसुध**–वि. बेशुद्ध, ताळचावर नसलेला.
**बेहंगम**–वि. बोजड, विचित्र. –पु. पक्षी.
**बेह**–वि. उत्तम. –पु. छिद्र, भोंक.
**बेहतर, बेहतरीन**–वि. बेहेत्तर, सर्वोत्तम.
**बेहतरी**–स्त्री. चांगुलपणा, कल्याण.
**बेहद**–वि. बेसुमार, अपरिमित.
**बेहना**–पु. कोष्टी, पिंजारी.
**बेहमैयत**–वि. निर्लज्ज.
**बेहया**–वि. निर्लज्ज, बेशरम.
**बेहयाई**–स्त्री. निर्लज्जता.
**बेहर**–वि. अचल, स्थावर, अलग, पृथक.
**बेहराना**–क्रि. अ. फाटणें.
**बेहरी**–स्त्री. पोस्त, वर्गणी.
**बेहला**–पु. व्हायोलिन (एक तंतुवाद्य).
**बेहाल**–अ. हलाखीच्या स्थितीस पोंचलेला,

व्याकुळ, बेचैन.
**बेहुनरा**–वि. मूर्ख, अशिक्षित.
**बेहूदगी**–स्त्री. असभ्यता, अशिष्टता.
**बेहूदा**–वि. असभ्य, अशिष्ट.
**बेहूदापन**–पु. अशिष्टता.
**बेहून**–अ. विना, वांचून.
**बेहैफ**–वि. निष्काळजी, बेफिकीर.
**बेहोष**–वि. बेशुद्ध.
**बेहोषी**–स्त्री. बेशुद्धि, मूर्छितावस्था.
**बेंगन**–पु. वांगें.
**बग (ज) नी**–वि. लाल निळ्या रंगाचा.
**बेंडा**–दि. आढें (घराचें).
**बैं**–स्त्री. वय, फणी (हातमागाची), विक्री.
**बैंआना**–पु. बयाणा.
**बैंकल**–वि. वेडा, उन्मत्त.
**बैंकलाना**–क्रि. अ. वेडा होणें.
**बैंकुंठ**–पु. वैकुंठ.
**बैंखानस, बैंषानस**–पु. तपस्वी, ऋषि.
**बैज**–पु. अंडीं, अंडकोश.
**बैजबी**–वि. अंडाकार.
**बैजा**–पु. अंडें, अंडकोश. [चौरंग, अधिवेशन.
**बैठक**–स्त्री. बसण्याची जागा, चौक, आसन,
**बैठकबाज**–वि. धूर्त, गोष्टी वेल्हाळ.
**बैठका**–पु. बैठकीची जागा, दिवाणखाना.
**बैठकी**–स्त्री. बैठका (व्यायामाचा प्रकार).
**बैठन**–स्त्री. आसन, बसण्याची तऱ्हा, बैठक.
**बैठना**–क्रि. अ. बसणें, जम बसणें, पिचणें, व्यवस्था बिघडणें, खर्च होणें, बेकार होणें, रिकामें राहणें, बरोबर नेम लागणें, अचूक लागणें.
**(मन वा दिल) बैठना**–मन जाणें, हताश [होणें.
**बैठे बैठाये**–उगीच, एकाएकीं.
**बैठेबैठे**–विनाकारण, अचानक.
**बैठवाना, बैठाना**–क्रि. स. बसविणें, संवय लावणें, जम बसविणें.
**बैठारना**–क्रि. स. बसविणें.
**बैत**–स्त्री. कविता, छंद, श्लोक.
**बैतुल्इल्म**–पु. शाळा, विद्यामंदिर.
**बैतुल्खला**–पु. संडास.
**बैतुल्माल**–पु. सरकारी खजीना, लुटीचा माल ठेवण्याचा मुसलमान व अरबांचा खजीना, बेवारशी माल. [स्थान.
**बैतुल्मुकद्दस**–पु. मक्का, मक्केचे प्रसिद्ध
**बैतुल हरम**–पु. मक्का.
**बैतुल्ला**–पु. काबा. [वैतरणी नदी.
**बैतरनी, बैतरणी**–स्त्री. यमलोकांतील
**बैताल**–पु. द्वारपाल, वेताळ, शंकराच्या गणांपैकीं एक, भूतबाधा झालेलें प्रेत.
**बैतालिक**–पु. स्तुतिपाठ गाऊन राजाला
**बैद**–पु. वैद्य. [जागविणारा स्तुतिपाठक.
**बैदक, बैद्यक**–पु. आयुर्वेद.
**बैदकी-गी**–स्त्री. वैद्यकी. [–पु. वेदवाक्य.
**बै (वै) दिक**–वि. वेदाचें, वेदपाठी, पवित्र.
**बैदेही**–स्त्री. सीता.
**बैन, बयन**–पु. वचन, वाणी, मध्य.
**बैना**–पु. वाणी, उत्सव किंवा मंगल कार्यानिमित्त इष्ट मित्रांना वांटली जाणारी मिठाई, अहेर, वाण. –क्रि. स. पेरणें.
**बै (वै) नतेय**–पु. गरुड, विनताचा मुलगा.
**बैनामा**–पु. विक्रीपत्र, साठेखत, विक्री.
**बैपार, व्यापार**–पु. व्यापार, व्यवसाय.
**बैपारी, व्यापारी**–पु. व्यापारी, धंदेवाईक.
**बै (वै) भव**–पु. वैभव, ऐश्वर्य, समृद्धि,
**बैयर**–स्त्री. स्त्री, बाई, लहान. [सामर्थ्य.
**बैया**–पु. वय, फणी, लहान नणंद.
**बैरंग**–वि. नॉटपेड (पत्र).

**बैर, बैर**–पु. वैर, शत्रुत्व, द्वेष, शौर्य, वैरीसमुदाय.
**बैर काढना या निकालना**–सूड उगविणें,
**बैर ठानना**–विरोध करणें. [उट्टें काढणें.
**बैर पड़ना**–वैरी बनणें.
**बैर बिसाहना या मोल लेना**–विरोध उत्पन्न
**बैर लेना**–सूड उगविणें. [करणें.
**बैरख**–पु. फौजेचा झेंडा, ध्वज.[ठेवण्याचें).
**बैरा**–पु. नोकर, नळकांडें (पेरतांना बीं
**बैराखी**–स्त्री. दंडांतील एक दागिना.
**बैराग**–पु. वैराग्य.
**बैरागी**–वि. उदासीन, विरक्त. –पु. वैष्णव मताच्या साधूंचा एक भेद, वीर.
**बैराग्य**–पु. वैराग्य, प्रपंचाबद्दल अनासक्ति, असंतोष.
**बैराना**–क्रि. अ. वातानें प्रकृती बिघडणें.
**बैरी**–पु. वैरी, विरोधी.
**बैरूँ, बैरून**–अ. बाहेर, वेगळें.–अ. शिवाय.
**बैरुनी**–वि. बाहेरील.
**बैल**–पु. बैल, मूर्ख. –वि. बिळांत रहाणाऱ्या (उंदीर वगैरे) प्राण्यांच्या संबंधी.
**बैसंदर**– पु. अग्नि. [जाति.
**बैस**–स्त्री. वय, आयुष्य, तारुण्य, एक क्षत्रिय
**बैसगडब**–पु. वासुदेव, (खेळ करणारा).
**बैसना**–क्रि. अ. बसणें.
**बैसर**–स्त्री. नागाची फणी.
**बैसा**–वि. बसलेला, विश्रांति घेतलेला.
**बैसाख**–पु. वैशाख.
**बैसाखी**–स्त्री. कुबडी, रब्बी पीक.
**बैसिक**–पु. वेश्येवर प्रेम करणारा, विषयी.
**बैहर**–वि. क्रोधी, भयंकर. –पु. वायु.
**बोआई**–स्त्री. पेरणी, पेरण्याची मजुरी.
**बोआना**–क्रि. स. पेरविणें.
**बोगदान**–पु. गारुड्याची पिशवी.
**बोजा**–स्त्री. तांदुळापासून बनविलेली दारू.
**बोझ**–पु. ओझें, भार, कामाचा बोजा, जबाबदारी.
**बोझना**–क्रि. स. भार टाकणें, (नाव, गाडी
**बोझा**–पाहा 'बोझ'. [वगैरेवर).
**बोझाई**–स्त्री. लादण्याची, चढविण्याची क्रिया (माल इ.).
**बोझिल**–वि. वजनदार, जड.
**बोटी**–स्त्री. मांसाचा लहान तुकडा.
**बोटी बोटी काटना**–शरीराचे तुकडे तुकडे
**बोड़ा**–पु. अजगर, चवळीची शेंग. [करणें.
**बोड़ी**–स्त्री. दमडी, कवडी, अल्प धन.
**बोतल**–पु. बाटली.
**बोतह, बोता**–पु. उंटाचा नर बच्चा, झाड, झाडी, शाल, वेलबुट्टी, बाणाचा नेम.
**बोदा**–वि. आळशी, सुस्त, मूर्ख, मंद बुद्धीचा,
**बोध**–पु. ज्ञान, संतोष. [फोफसा, फुसफुशीत.
**बोना**–क्रि. स. पेरणें.
**बोबा**–पु. स्तन, गठ्ठा, सटरफटर वस्तु.
**बोय**–स्त्री. वास.
**बोर**–पु. बुडविण्याची क्रिया.
**बोरना**–क्रि.स.बुडविणें, बुचकळणें, बदनामी
**बोरसी**–स्त्री. शेगडी. [करणें, रंगविणें.
**बोरा**–पु, पोतें.
**बोरिया**–पु. चटई.
**बोरी**–स्त्री. लहान पोतें.
**बोल**–पु. वचन, टोमणा, प्रतिज्ञा, बाजाचा सुस्वर. [भाषा, कुरापत.
**बोलचाल**–स्त्री. संभाषण, व्यवहाराची–
**बोलचाल न होना**–मन स्वच्छ नसणें.
**बोलता**–पु. जीव, आत्मा.–वि. खूप
**बोलती**–स्त्री. वाचा. [बोलणारा, बोलका.

**बोलना**–क्रि. स. सांगणें, कथन करणें, निश्चय करणें, ठरविणें, अडविणें, रोखणें, प्रतिरोध करणें.–क्रि. अ. बोलणें, भाषण करणें, आवाज होणें.
**बोलजाना**–राम म्हणणें, मरणें (अशिष्ट).
**बोलबाला**–पु. प्रसिद्धि, जयजयकार.
**बोली**–भाषा, बोली, टोमणा, लिलांव, [बोलणें.
**बोलीगेली**–स्त्री. थट्टामस्करी.
**बोवना**–क्रि. स. पेरणें.
**बोवाना**–क्रि. स. पेरणी करविणें.
**बोश**–पु. वजन, दबाव, दबदबा, हलकट [माणूस.
**बोसा**–पु. चुंबन, मुका.
**बोसीदा**–वि. जुना, खराब.
**बोस्तॉं**–पु. बाग.
**बोह**–स्त्री. बुडी.
**बोहतान**–पु. मिथ्या आरोप, दूषण.
**बोहतान जोड़ना**–कलंक लावणें.
**बोहनी**–स्त्री. बोहणी.
**बोहित**–पु. मोटी नाव, जहाज. [(कापसाचें).
**बौंड बौंडा**–स्त्री. वेल, डहाळी, बोंड
**बौंडना**–क्रि. अ. वेलीप्रमाणें वाढणें.
**बौंडर**–पु. वावटळ.
**बौंडी**–स्त्री. शेंग, कच्चें फळ, दमडी.
**बौआना**–क्रि. अ. झोपेंत बडबडणें, वेड्यासारखें बडबडणें.
**बौखल**–वि. रागीट, विक्षिप्त, चिडखोर.
**बौखलाना**–क्रि. अ. रागावून बोलावणें, [कातावणें.
**बौछार**–स्त्री. तुषार, बुरबुर.
**बौना**–पु. खुजा माणूस, वामनमूर्ति.
**बौर**–पु. मोहर.
**बौरना**–क्रि. अ. आंब्याला मोहर येणें.
**बौरहा–बौरा**–वि. विक्षिप्त, वेडा, बावळट, भोळा, अजागळ, मुका.
**बौराई**–स्त्री. विक्षिप्तपणा.
**बौराना**–क्रि. अ. वेड लागणें, विक्षिप्त होणें, मनावरचा ताबा जाणें. विवेक सुटणें.–क्रि. स. एखाद्याला बनविणें, फजिती [करणें, वेड लावणें.
**बौराह**–वि. वेडा.
**बौरी**–वि. वेडी.
**बौलसिरी**–स्त्री. बकुळीचें झाड, व फूल.
**बौलाना**–क्रि. अ. पाहा 'बौखलाना,
**बौहर**–स्त्री. वधू, सून.
**ब्यजन–ना**–पु. पंखा. [देणें.
**ब्यहाना**–क्रि.स. लग्न करविणें, लग्न करून
**ब्याकुल**–पु. गोंधळलेला, विव्हल, भयभीत, गढून गेलेला, विस्कटलेला, चंचल.
**ब्याज, ब्याज**–पु. कपट, लपविणें, निमित्त, युक्ति, कृत्रिमपणा, दोष, व्याज, इशारा
**ब्याधा, ब्याध**–पु. व्याध, पारधी, नीच, दुष्ट.
**ब्याना**–क्रि. स. विणें.
**ब्याप, ब्याप**–पु. व्याप, पसारा.
**ब्यापना**–क्रि. अ. व्यापणें, प्रसरणें.
**ब्यारी**–स्त्री. रात्रीचें भोजन.–पु. वाळू.
**ब्याल**–पु. अजगर, हत्ती.
**ब्यालू**–पु. रात्रीचा फराळ.
**ब्यास**–पु. विस्तार, विभागणें, विभागकरणारा, वेगळें करणें, भेद, रचना, रुंदी,
**ब्याह**–पु. विवाह, लग्न. [व्यास, पुराणिक.
**ब्याहता**–वि. विवाहित, लग्न झालेला.
**ब्याहना**–क्रि. विवाह करणें.
**ब्याहा**–वि. विवाहित.
**ब्याहुला**–वि. लग्नाचा.
**ब्यूंगा**–पु. रापी (कातडें सोलण्याची)
**ब्योंचना**–क्रि. अ. मुरगळणें.
**ब्योंत**–पु. सोय, व्यवस्था, युक्ति, उपाय, कार्य-पद्धति, कपडे बेतण्यासाठीं कापड–

**ब्योंत बांधना**–सिद्धता करणें. [ फाडणें.
**ब्योंतना**–क्रि. कपडे बेतणें.
**ब्योपार, ब्यापार**–पु. व्यापार, कर्म.
**ब्योरन**–स्त्री. केस विंचरणें, गुंतवळ काढणें,
**ब्योरना**–क्रि. वेणी सोडणें. [ खबर.
**ब्योरा**–पु. तपशील, विवरण, वृत्तान्त,
**ब्योरेवार**–तपशीलवार, सविस्तर.
**ब्योहर**–पु. व्याजबट्याचा व्यवहार.
**ब्योहरिया**–पु. सावकार, देण्याघेण्याचा
**ब्योहार**–पु. व्यवहार. [व्यवहार करणारा.
**ब्रज**–पु. गोकुळ.
**ब्रन, ब्रण**–पु. व्रण, फोड, गळू, वण.
**ब्रह्म**–पु. ईश्वर, परमात्मा, स्तोत्र, मंत्र, वेद, ओंकार, ब्राह्मण, ब्राह्मणजाति ब्रह्मतेज, तप, ब्रह्मचर्य, अध्यात्मज्ञान, उपनिषद, स्वरूप, ब्रह्मास्त्र, गायत्री, ज्ञान, तत्त्व, ब्रह्मदेव, यज्ञांतील ऋत्विज, ब्रह्मलोक.–वि. ब्रह्मज्ञानी, तपस्वी. बृहस्पति.
**ब्रह्मांड**–पु. संपूर्ण विश्व, डोक्याची कवटी.
**ब्राह्मण**–पु. ब्राह्मण, विष्णु, शंकर, वेदाचा एक भाग, उपाध्याय, अभिजित, ब्राह्मण समूह. –वि. ब्रह्मज्ञानी, ब्राह्मणाचें.
**ब्राह्मणी**–स्त्री. बुद्धि, ब्राह्मणजातीची, स्त्री, ब्राह्मण पत्नी, चोपय (सरडा) सोनपितळ, भारंगव.
**ब्राह्मी**–स्त्री. ब्रह्मशक्ति, सरस्वती, भाषण, वाणी, वेदोक्त विधि, ब्रह्मविवाह झालेली, ब्राह्मणपत्नी, सोमवल्ली, सप्तमातृकांपैकीं एक.
**ब्रीडा, व्रीडा**–स्त्री. लज्जा, संकोच, विनय.

## [भ]

**भंकार**–पु. विकट हास्य, विकट शब्द.
**भंग**–पु. लाट, पराजय, तुकडा, खंड, कुटिलता, भय, अडचण, बाधा.
**भंग(गे)ड-डी**–वि. भांगेचें व्यसन असलेला,
**भंगरा**–पु. माका, एक वस्त्र. [ भंगड.
**भंगना**–क्रि. अ. भंग होणें, तुटणें, दबलें जाणें.–क्रि. स. तोडणें, दाबणें. [कटाक्ष.
**भंगिमा-भंगी**–स्त्री. वांकडेपणा, हावभाव,
**भंगी**–वि. नाश पावणारे, भांग पिणारा.
**भंगेडी**–वि. भांग पिणारा. [–पु. भंगी.
**भंजन**–वि. तोडणारा.–पु. मोडतोड, नाश, पराजय करणें, पिडणें, अडविणें.
**भँजना**–क्रि. अ. तुकडे तुकडे होणें, तुटणें, मोडणें, खुर्दा होणें (नाण्यांचा).
**भँजाना**–क्रि. स. वटविणें, मोड करणें (रुपयांची), विध्वंस करणें, दूर करणें.
**भंटा**–पु. वांगें. [बोलणारा.
**भंड**–वि. धूर्त, पाखंडी, अश्लील शब्द
**भँड़ताल**–पु. नाच गाण्याचा एक प्रकार, ज्यांत टाळ्या वाजवितात.
**भँड़ना**–क्रि. स. हानि पोहचविणें, बिघडविणें, नष्ट-भ्रष्ट करणें, तोडणें, बदनाम करणें. [ मातीचें भांडें फुटणें.
**भँड़फोड**–पु. बेंड फुटणें, रहस्य प्रकट होणें,
**भँडभाँड़**–पु. भांड (वनस्पति) भांडें.
**भँड़सार-ल**–स्त्री. धान्याचें कोठार.
**भंडा**–पु. भांडें, रहस्य.
**भंडा फुटना**–बेंड फुटणें, गौप्य स्फोट होणें.
**भँडाना**–क्रि. स. भंडावणें, नष्ट करणें.
**भंडार**–पु. खजिना, कोठार, वखार, पाकशाळा, पोट. [साधूंचें भोजन.
**भंडारा**–पु. स्वैंपाकघर, रमणा, पोट, समूह,

**भंडारी**–स्त्री. लहान खोली, खजिना.–पु.
**भंडारू**–पु. भांडार. [खजिनदार, आचारी.
**भंडौआ**–पु. भाटांचें गीत.
**भँभाना**–क्रि. अ. हुंबरणें.
**भँभीरी**–स्त्री. लालरंगाचा पावसाळी
**भँभेरी**–स्त्री. भय, भीति. [किडा.
**भँवना**–क्रि. अ. फिरणें.
**भँवफेर**–पु. संसारचक्र, भ्रम.
**भँवर**–पु. भुंगा, पाण्याचा भोंवरा, खळगा.
**भँवर कली**–स्त्री. फिरती कडी, कळसूत्र.
**भँवर जाल**–पु. संसार पाश.
**भँवर भीख**–स्त्री. जोगवा.
**भँवरी**–स्त्री. फेरी, खेप (फेरीवाल्याची) पाण्याचा भोंवरा, केसांतील भोंवरा.
**भँवाना, भमाना**–क्रि. स. फिरविणें, चकरा देणें, बुचकळयांत पाडणें.
**भँसना**–क्रि. अ. पाण्यांत फेंकलें जाणें.
**भइया**–पु. भाऊ.
**भई**–क्रि. अ. झाली.–अ. बावारे–पु. भाऊ.
**भउजाई, भौजाई**–स्त्री. भावजय.
**भकाऊँ**–पु. बागुलबुवा.
**भकुआ**–वि. मूर्ख.
**भकुआना**–क्रि. स. घाबरें होणें.–क्रि. अ. घाबरविणें, बनविणें, थट्टा करणें.
**भकोसना**–क्रि. स. बकाबक खाणें, बोकणा
**भख**–पु. आहार, भोजन. [भरणें.
**भखना**–क्रि. स. खाणें.
**भग**–पु. आदित्य.–वि. (विवाहाची देवता), सुदेव, कल्याण, बढती, सौंदर्य, कीर्ति, प्रयत्न, प्रेम, विलास, स्त्री योनि, धर्म, सद्‌गुण, पुण्य, विरक्ति, मोक्ष, सर्वशक्तिमत्त्व, ऐश्वर्य, माहात्म्य, पराक्रम, पूर्वाफल्गुनी, उत्तरा फल्गुनी नक्षत्र.

**भगत, भक्त**–वि. तल्लीन, निष्ठावंत, जोडलेला, शिजवलेलें, वांटलेले, दुसऱ्यास दिलेलें. भक्त, उपासक, शाकाहारी, साधु, भात, अन्न,भाग, भोजन, वेतन, पोटगी, धान्य, भूतबाधा उतरविणारा मांत्रिक.
**भगतबछल, भक्तवत्सल**–वि. भक्त वत्सल.
**भगति-ती, भक्ति**–स्त्री. भक्ति, विभागणें, तुकडा, उपासना, सेवा, श्रद्धा रचना, आकृति, वेलबुट्टी, चितारी काम.
**भगतिया**–पु. राजपुतान्यांतील कलावंति-
**भगदड़-र**–स्त्री. पळापळ. [णीची एक जात.
**भगदेव**–पु. अतिविलासी मनुष्य.
**भगना**–क्रि. अ. पळून जाणें. [अन्न.
**भगमास**–पु. फाल्गुनमास.
**भगर–ल**–पु. ढोंग, कपट, जादू, सडलेलें
**भगली**–वि. ढोंगी, जादुगार.
**भगवंत, भगवत**–पु. ईश्वर, विष्णु, जैन, गौतमबुद्ध.–वि. ऐश्वर्ययुक्त, पूज्य.
**भगवती**–स्त्री. लक्ष्मी, दुर्गा, पूज्य स्त्री.
**भगवान**–पु. ईश्वर.
**भगाना**–क्रि. स. दूर करणें, पळविणें.
**भगिनी**–स्त्री. बहीण, स्त्री.
**भगीरथ**–वि. फार मोठा.–पु. अयोध्येचा राजा, भगीरथ.
**भगोड़ा**–वि. पळालेला, पळपुटा, भित्रा.
**भगौती**–स्त्री. भगवती, लक्ष्मी, दुर्गा, पूज्य स्त्री. [भगवा (रंग).
**भगौहाँ**–वि. भगवा, भ्याड, पळपुटचा
**भग्गुल,भग्गू**–वि. पळपुटचा, भेदरट.
**भचक**–स्त्री. लंगडेपणा. [चकित होणें.
**भचकना**–क्रि. अ. फेंगडें चालणें, आश्चर्य-
**भच्छ, भक्ष**–पु. भक्ष, खाद्य.

**भच्छना**–क्रि. स. भक्षण करणें, खाणें.
**भजन**–पु. सेवा, पूजा, भजन, जप, विभाजन, मालकी उपभाग.
**भजना**–क्रि. स. भजणें, आश्रय घेणें, ईश्वर नामाचा जप करणें.–क्रि. अ. पोहोंचणें,
**भजनी**–पु. भजन करणार. [पळून जाणें.
**भजाना**–क्रि. स. पळविणें, दूर करणें.
**भजामहे**– आम्ही भजन करतों.
**भजामि**– मी भजन करतों.
**भट**–पु. योध्दा, वीर, रानटी मनुष्य, म्लेच्छभेद, पामरभेद, राक्षस.
**भटकटाई**–स्त्री. वनस्पतिविशेष.
**भटकना**–क्रि. अ. भटकणें, बुचकळ्यांत पडणें, रस्ता चुकल्यामुळें इकडे तिकडे भटकणें. [बुचकळ्यांत पाडणें.
**भटकाना**–क्रि. स. चुकीचा मार्ग दाखविणें,
**भटकैया**–पु. भटक्या, भटकविणारा.
**भटकौहाँ**–वि. भटकविणारा.
**भटभेड़ा-रा**–पु. टक्कर, धक्का, सामना,
**भटा**–पु. वांगें. [ठोकर, अनपक्षित भेट.
**(कथा के) भटा**–पुराणांतील वांगीं.
**भट**–स्त्री. सखी, मैत्रीण, स्त्रियांकरितां आदरसूचक संबोधन.
**भट्ट**–पु. धनी, विद्वान (एक पदवी), श्रेष्ठ, भाट (क्षत्रिय व ब्राह्मणीयांचा पुत्र.) [कौलांची भट्टी.
**भट्टा**–पु. मोठी भट्टी, विटाची किंवा
**भट्टिनी**–स्त्री. ब्राह्मणी, पट्टराणीहून अन्य राजपत्नी. [करण्याची जागा.
**भट्टी**–स्त्री. मोठी चूल, भट्टी, दारू तयार
**भट्ठा**–पु. आवा, भट्टी. [शिवराळपणा.
**भठियारपन**–पु. भाकरी भाजण्याचा धंदा,
**भठियारा**–पु. खानावळवाला (मुसलमान). धर्मशाळेचा व्यवस्थापक.
**भडंबा**–पु. अवडंबर. [सुटणें.
**भड़क**–स्त्री. दिखाऊपणा, बहकणें, ताबा
**भड़कदार**–वि. भडकदार, रुबाबदार, चमकदार. [(पशु), रागावणें.
**भड़कना**–क्रि. अ. पेटणें, भडकणें, बुजणें
**भड़काना**–क्रि. स. प्रज्वलित करणें, पेटविणें, फुस देणें, बुजगावणें भयभीत करणें, (जनावराकरितां) [होणारा.
**भड़कीला**–वि. भडकदार, भिऊन उत्तेजित
**भड़कैल**–वि. जंगली, अडाणी.
**भड़भड़ाना**–क्रि. अ. भडभड शब्द करणें,
**भड़भड़िया**–वि. बडबड्या. [भडभडून येणें.
**भड़भूँजा**–पु. भुंजारी, भडभुंजा.
**भड़िहा**–पु. चोर.
**भड़िहाई**–अ. लपून, चोरटेपणानें.
**भड़ी**–स्त्री. लबाडीचें उत्तेजन.
**भड़ुआ**–पु. वेश्येचा दलाल. [सांगणें.
**भणना, भनकना, भनना**–क्रि. अ. बोलणें,
**भणित-ति भनित**–वि. सांगितलेलें. –स्त्री.
**भतीजा**–पु. पुतण्या. [भाषण, वाणी.
**भतीजी**–स्त्री. पुतणी.
**भक्त**–पु. निष्ठावंत, उपासक.–पाहा 'भगत'
**भत्ता**–पु. भत्ता.
**भदंत**–वि. पूज्य पु. बौद्धसाधु.
**भदई**–स्त्री. भाद्रपद महिन्यांत होणारें पीक.
**भदाक**–पु. धाडकन पडण्याचा शब्द.
**भदेसिल**–वि. बोजड, ओंगळ.
**भदौरिया**–पु. ग्वाल्हेर प्रांतांतील एक
**भद्दा**–वि. कुरूप, मद्दड. [क्षत्रिय जात.
**भद्दापन**–पु. कुरूपता.
**भद्र**–वि. सुखी, शुभ, अनुकूल, चांगला, सुन्दर, सुखकर, श्रेष्ठ, साधु, कल्याण-

कारक, सभ्य, स्तुत्य.–पु. बैल, हत्तीभेद, खंजरीट पक्षी, ढोंगी, देवदार, कडधान्य, नागरमोथा, पोलाद, नीलकमल, सुमेरू पर्वत, सोने, उत्तरेचा दिग्गज, दाढी मिशांचे व डोक्याचें मुंडण, सुख.–स्त्री. गंगा, गाय, तिथि (२, ७, १२ ह्या) सुभद्रा, हळद, श्वेतदूर्वा, आकाशगंगा.

**भद्रता**–स्त्री. शिष्टता, सभ्यता, माणुसकी.

**भद्री**–वि. भाग्यवान.

**भनई**–क्रि. स. म्हणतो, म्हणते.

**भनक**–स्त्री. अफवा, खोल आवाज.

**भनना**–क्रि. स. सांगणें, आवाज करणें.

**भनभनाना**–क्रि. अ. गुणगुणणें, भणभणणें.

**भनभनाहट**–क्रि. अ. भणभणणें. [नोट).

**भनाना**–क्रि. स. मोड करणें, मोडण (हुंडी,

**भनित**–वि. म्हटलेलें.–पहा 'भणित.'

**भन्नाना**–क्रि. अ. फणा काढून अंगावर येणें, रागावणें, वसकन अंगावर येणें.

**भभ(ब)का**–पु. अर्क काढण्याचें यंत्र.

**भभक**–स्त्री. उकळी.

**भभ (ब) कना**–क्रि. अ. भडकणें, पेटणें, उष्णतेमुळें फुटणें,तडकणें, उकळी फुटणें.

**भभकी**–स्त्री. पोकळ दम, दटावणी.

**भभरना**–स्त्री. अ. भयभीत होणें,घाबरणें, बुचकळ्यांत पडणें.

**भभराना**–रोमांचित होणें.

**भभूका**–पु. ज्वाला.

**भभूत-ति**–स्त्री. राख, अंगारा.

**भभोरना**–क्रि. स. फाडून खाणें.

**भभ्भड़**–स्त्री. दाटी.

**भयंकर**–वि. धोक्याचें, भीतिप्रद, भयानक.

**भय**–पु. भीति, संकट.

**भयभीत**–वि. घाबरलेला, भ्यालेला.

**भया**–क्रि. अ. झालें.

**भयाकुल**–वि. भीतीनें घाबरलेला.

**भयाग**–वि. भयानक, भीतिप्रद.

**भयानक**–वि. भयंकर.–पु. राहु, वाघ, भया-

**भयावन-ना**–वि. भयंकर. [नक रस, भय.

**भयाहू**–स्त्री. धाकटी भावजय.

**भरंत**–स्त्री. संदेश, संशय.

**भर**–पु. भार, बोजा, वजन, समूह, ढीग, वैपुल्य, दोन हजार पल वजन (भार).–अ. कडून, द्वारा.–वि. एकंदर, संपूर्ण, धारण करणारा.

**भर(ड़)कना**–क्रि. अ. भडकणें, चमकणें.

**भरत**–पु. भारद्वाज पक्षी, कांसें, तांबट, भरतमुनि, राजा भरत, नट.

**भरतखंड**–पु. भारत खंड, हिंदुस्तान.

**भरद्वाज**–पु. एका मुनीचें नांव.

**भरता**–पु. भरीत, रायतें, प्रभु, स्वामी, धनी,

**भरतार**–पु. पति, नवरा. [नायक, पालक.

**भरती**– स्त्री. पुरण भरण्याची क्रिया, भर, प्रवेश, भरती.

**भरती का**–रद्दी, साधारण, मामुली.

**भरण, भरन**–पु. पालनपोषण, वेतन, धारण करणें, भरणी नक्षत्र.

**भरणी-नी**–स्त्री. भरणी नक्षत्र, घोसाळी.

**भरना**–क्रि. स. भरणें, घालणें, पूर्ण करणें, कर्ज फेडणें, चुकतें करणें,उपरोध, निंदा करणें, भरून जाणें, शरीराला लावणें, लेपणें, निभावणें.–क्रि. अ. शरीर धष्टपुष्ट होणें.–पु. लांच.

**(कोंछ) भरना**–ओटी भरणें. [भरणें.

**(मांग) भरना**–वरानें वधूच्या भांगांत शेंदूर

**भरनि**–स्त्री. पोशाख, पेहराव.

**भरनी-णी**–वि. पाळणारी, पूर्ण करणारी.–

स्त्री. भरणी नक्षत्र, ह्याच्यांत पाऊस पडल्यानें सर्प मरतात. [पाई, पोंच.
**भरपाई**—अ. चांगल्या रीतीनें.—स्त्री. भर-
**भरपाना**—मिळवणें.
**भरपूर**—वि. भरपूर.—अ. चांगल्या तऱ्हेनें, पूर्ण रूपानें. [घाबरणें.
**भरभराना**—क्रि. अ. रोमांचित होणें,
**भरभेंटा**—पु. सामना, लढाई.
**भरम, भ्रम**—पु. भ्रम, घोटाळा, रहस्य.
**भरम गँवाना**—रहस्यस्फोट करणें.
**भरमन—भ्रमण**—पु. सहल, चुकणें, भटकणें.
**भरमना**—क्रि. अ. फिरणें, भटकणें, संशयांत पडणें.—स्त्री. चूक, बुचकळा.
**भरमाना**—क्रि. स. फूस लावणें, दारोदार हिंडविणें, धोक्यांत पाडणें.
**भरमार**—स्त्री. विपुलता.
**भरमीला**—वि. संशयी, भ्रमिष्ट.
**भरराना**—क्रि. अ. कडकडणें, तुटून पडणें.
**भरवाना**—क्रि. स. भरविणें.
**भरसक**—अ. यथाशक्ति.
**भरसन-ना**—स्त्री. धमकी, निंदा.
**भरसाईं**—पु. भट्टी.
**भरहराना**—क्रि. अ. कडकड होऊन पडणें.
**भरांति, भ्रांति**—स्त्री. भ्रांति, भ्रम. [मजुरी.
**भराई**—स्त्री. भरण्याची क्रिया, भरण्याची
**भरिता**—वि. भरणारी, पूर्ण करणारी, पालन करणारी. [वजन.
**भरी**—स्त्री. एक रुपया किंवा १० मासे,
**भरुआना**—क्रि. अ. जड होणें भारावणें.
**भरुहाना**—क्रि. अ. घमेंड करणें.—क्रि. स. उत्तेजित करणें, भडकविणें, फूस लावणें.
**भरैय्या**—पु. पालक.—वि. भरणारा.
**भरोसा**—पु. भरंवसा, विश्वास, आशा, उमेद, साहाय्य, अवलंब.
**भर्त्सन-ना**—स्त्री. निंदा, निर्भत्सना, दटा-
**भर्म**—पु. भ्रम. [वणी.
**भर्राना**—क्रि. अ. भर्र भर्र शब्द होणें.
**भल**—वि. चांगलें, उत्तम.
**भलपति**—पु. भालाइत. [माणुसकी.
**भलमनसत—भलमनसी**—स्त्री. सज्जनता,
**भला**—वि. चांगला, भला, उत्तम, पहिल्या प्रतीचा.—पु. कल्याण, कुशल.—अ. बरें,
**भलाई**—स्त्री. चांगुलपणा. [अस्तु.
**भले**—अ. चांगल्या तऱ्हेनें, वाहवा, भले
**भले ही**—असेना कां. [शाबास.
**भलेरा**—वि. चांगला.
**भवंग-गा—भवंगम**—पु. साप.
**भवंर**—पु. भोंवरा.
**भवंरी**—स्त्री. भ्रमरी.
**भव**—पु. अस्तित्व, मूळ कारण, उत्पत्ति, जन्म, मेघ, ढग, कुशल, संसार, उत्कर्ष, भय, कल्याण, शंकर, शरीर, लाभ.—वि. उत्पन्न झालेला वा होणारा, शुभ.
**भव(वि)तव्यता**—स्त्री. दैव, भविष्य.
**भवदंघ्रि**—तुमचे पाय.
**भवदीय—भवद्**—स. आपला, तुमचा.
**भवन**—पु. घर, अस्तित्व, स्थान, उत्पत्ति, शेत, देऊळ, महाल, संसार.
**भवना**—क्रि. अ. वांकणें, वळणें, फिरणें.
**भवनी**—स्त्री. भार्या, स्त्री.
**भवमोचन**—वि. संसारातून सोडविणारा.
**भवाँ**—स्त्री. फेरी.
**भवाम्बुनाथ**—पु. संसार सागर.
**भविष, भविष्य—षत्**—वि. होणारा, पुढें घडणारें भविष्य.
**भवीला**—वि. भावपूर्ण, वांकडा, तिरपा.

**भवैंय्या**—पु. नर्तक.
**भव्य**—वि. असणारा, होणारा संभवित, विशाल, उदार, मनोहर, शुभ, सत्य, योग्य, चांगलें, श्रेष्ठ, सुंदर, मंगल, शांत. —स्त्री. गजपिंपळी, पार्वती.-पु. अस्तित्व, भविष्यकाळ, परिणाम, कल्याण, हाड,
**भष**—पु. भोजन, आहार, कुत्रा. [कर्मरवनस्पति.
**भषक**—पु. कुत्रा.
**भषना**—क्रि. खाणें, जेवणें.
**भस**—पु. भस्म, राख, भपकारा, घाण. —वि. प्रकाशणारा. [भरणें.
**भसकना**—क्रि. अ. पडणें, फांकणें, बोकणा
**भसना**—क्रि. अ. तरंगणें, बुडणें, पोहणें.
**भसम, भस्म**—पु. भस्म, राख.
**भसमा**—पु. एक कलप, पीट.
**भसान**—पु. विसर्जन (मूर्तीचें).
**भसींडा**—स्त्री. कमलाचें देठ.
**भसुंड**—पु. हत्ती.
**भसुर**—पु. वडील दीर, पतीचा मोठा भाऊ.
**भस्त्रा, भस्त्रका, भस्त्री**—स्त्री. भाता वारा फुंकण्याचा) कातडी, पिशवी.
**भहराना**—क्रि. अ. तुटून पडणें, कोसळणें.
**भाँउ**—पु. भाव, हेतु.
**भाँउर**—स्त्री. सप्तपदी.
**भाँज**—स्त्री. नाण्याची मोड करण्याबद्दल दिला जाणारा बट्टा.
**भाँजना**—क्रि. स. घडी घालणें, जोडी फिरविणें (व्यायामाचा प्रकार). [मोडणें.
**भाँजी**—स्त्री. कामांत व्यत्यय आणणें, भाची
**भाँजी मारना**—विघ्न आणणें, दुसऱ्याची हानी होईल असें बोलणें.
**भाँटा**—पु. वांगें. [निर्लज्ज.—पु. भांडें, उपद्रव.
**भाँड**—पु. भाट, विदूषक, हसविणारा,
**भाँडना**—क्रि.अ. दारोदार हिंडणें, भटकणें.— क्रि. स. एखाद्याची बदनामी करणें,
**भाँडा**—पु. भांडें. [नाश करणें, झगडणें.
**भाँड़ा भरना**—पश्चात्ताप करणें.
**भाँडार**—पु. कोठार खजीना.
**भांडे**—भांड्यांत, कुंडांत.
**भाँत-ति**—स्त्री. प्रकार.
**भाँपना**—क्रि. स. ताडणें, ओळखणें, पाहणें.
**भाँयँभाँयँ**—पु. किर्र शब्द.
**भाँरी, भाँवरी**—स्त्री. सप्तपदी विवाह.
**भा**—स्त्री. कांति, तेज, शोभा, किरण, वीज.
**भाइ**—पु. प्रेम, स्नेह, स्वभाव, विचार.—स्त्री. प्रकार, रीत.
**भाइप**—पु. स्नेहसंबंध, आप्तसंबंध.
**भाई**—पु. भाऊ, सजातीय.
**भाईचारा**—पु. स्नेहसंबंध.
**भाईदूज**—स्त्री. भाऊबीज.
**भाईबिरादरी**—स्त्री. जातभाई.
**भाउ**—पु. चित्तवृत्ति, भावना, प्रेम, स्नेह.
**भाऊ**—पु. प्रेम, स्नेह, भावना, स्वभाव, स्थिति, अवस्था, महत्त्व, रूप, सत्ता,
**भाएँ**—अ. समजुतीप्रमाणें. [वृत्ति.
**भाकसी**—स्त्री. भट्टी.
**भाख**—पु. भाषण, बोलणें.
**भाखना**—क्रि. स. भाषण करणें, बोलणें.
**भाखा, भाषा**—स्त्री. भाषा, बोली.
**भाग**—पु. दैव, कपाळ, सकाळ, भागाकार, खंड, अंश, वांटणी, चौथा हिस्सा, बाजू कालमान विशेष, राशीचा $\frac{1}{30}$ अंश, वर्तुळाचा $\frac{1}{360}$, जागा (ठरलेली) अधेली,
**भागड़**—स्त्री. धांवपळ. [अकरा (संख्या).
**भागना**—क्रि. अ. पळणें. [पळणें.
**(सिरपर पैर रखकर) भागना**—जीव घेऊन

**भागते भूतकी लंगोटी सही**–चोराची लंगोटी.
**भाग(गि)नेय**–पु. भाचा.
**भागी**–वि. हिस्सेदार, मालक, हक्कदार, भाग्यवान, गौण. पु.–वारस.
**भाग्य**–वि. वांटे करण्यास योग्य, अंशभूत, सुदैवी, व्याजी लावलेलें.–पु. भागीदार, दैव,सुदैव,ऐश्वर्य,शुभ किंवा अशुभ कर्म.
**भाग्यवान**–वि. नशिबवान.
**भाज्**– (समासांती) हिस्सा घेणारा भोगणारा, अनुभवणारा, राहणारा, आश्रयणारा, भजणारा (जसें–सुख-भाज–भोगणारा).
**भाजन**–पु. पात्र, भांडें, आधार, योग्य, विभागणें, भागाकार, ६४ पळें (माप).
**भाजना**–क्रि.अ. पळून जाणें.
**भाजी**– स्त्री. भाजी, भाताची पेज, सेवक, शुभप्रसंगीं वाटली जाणारी वस्तु.
**भाट**–पु. राजाचा स्तुतिपाठक, खुशामती.
**भाटा**–पु.उतार, पाण्याचा ओसर, समुद्राची ओहोटी.
**भाटी**–पु. क्षत्रियांची एक जात.
**भाटचौ**–पु. यशोगान, भाटाचें काम.
**भाठी**–स्त्री. भट्टी, पाण्याचा ओसर.
**भाड़**–पु. भट्टी (भडभुंजाची), घरकुल (वाळूचें).
**भाड़ झोंकना**–तुच्छ, निरर्थक काम.
**भाड़े में झोंकना अथवा डालना**–फुकट घालविणें, नाश करणें.
**भाड लीप कर हाथ काले करना**–शेवटीं अपयश येणें.
**भाड़ा**–पु. एक गवत, पवन वाहण्याची दिशा.
**भाडे का टट्टू**–तात्पुरता, निरुपयोगी, भाड्याचा बैल.
**भात**–पु. प्रकाश, सकाळ, भात, लग्नांतील एक रीति.
**भाति-ती**– स्त्री. प्रकाश, शोभा, कांति.
**भाथा**–पु. भाता, बाणांचा भाता.
**भाथी**–स्त्री. भट्टी पेटविण्याचा भाता.
**भादों**–पु. भाद्रपद महिना.
**भान**–पु. प्रकाश, दीप्ति, चमक, आभास, प्रतिति, ज्ञान.
**भानजा**–पु. भाचा.
**भानना**–क्रि. स. तोडणें, भंग करणें, नष्ट करणें.
**भान(नु)मती**–स्त्री. जादुगारीण.
**भानवी**–स्त्री. यमुनानदी.
**भाना**–क्रि. अ. बरें वाटणें, आवडणें,शोभणें, माहीत होणें. –क्रि. स. चमकविणें.
**भानु**–पु. सूर्य, किरण, स्वामी, राजा.
**भानुजा,भानुसुता**–स्त्री. यमुना नदी.
**भाप**–स्त्री. वाफ.
**भापना**–क्रि. स. ओळखणें, ताडणें, अनुमानणें.
**भाभर**–पु. डोंगराच्या पायथ्याचें जंगल.
**भाभरा**–वि. लाल रंगाचा.
**भाभी**– स्त्री. भावजय.
**भाम**–वि. पूज्य.–स्त्री. रागीट नारी, सत्यभामा.–पु. एक वर्णवृत्त,भगिनीपति, तेज, सूर्य, क्रोध.
**भामा**–स्त्री. स्त्री, बायको.
**भामिनी**–स्त्री. बायको, स्त्री. रागीट स्त्री.
**भाय**–पु. भाऊ, भावना, परिणाम, प्रकार, प्रीति, दर.
**भाया**–वि. प्रिय, आवडता.
**भायें**–अ. अनुमानांत, जाणण्यांत.
**भाये**–क्रि. स. बरें वाटलें.
**भारंगी**–स्त्री. कर्षशिंग (औषधि).
**भार**–पु. आधिक्य, पराकाष्ठा, बोजा, रक्षण, सांभाळ, जबाबदारी, श्रम, समूह सामग्री, अडसष्ठ हजार तोळे वजन, बत्तीस पायली वजन, जोखंड, ओझें वाहण्याची दांडी.

**भार उठाना**–जबाबदारी आपल्या शिरा-वर घेणें. [होणें.

**भार उतरना**– कर्तव्याच्या ऋणांतून मुक्त

**भारत**–पु. हिन्दुस्तानवासी, नट, विदुर, हिन्दुस्तान, नाट्य, संगित, महाभारत, लांब लचक कथा, युद्ध.

**भारती**–स्त्री. भाषण, ग्रंथरचना, वाणी, सरस्वती, ब्राम्ही.

**भारा**–वि. पाहा 'भारी'.

**भारी**–वि. जड, वजनदार, गंभीर, कठिण, विशाल, अधिक, असह्य, सुजलेला.

**भारी भरकम**–भर भक्कम.

**भाल**–पु. कपाळ, बरछी, भाला, पातें, अस्वल, प्रकाश, तेज. [क्षण करणें.

**भालना**– क्रि. स. शोधणें, तपासणें, निरी-

**भाला**–पु. भाला. [भालाईत.

**भालाबरदार**–पु. भाला चालविणारा,

**भालि-ली**–स्त्री. बरची, कांटा, पातें.

**भालुक, भालू**–पु. अस्वल.

**भाव**–पु. अस्तित्व, घडणारी गोष्ट, स्थिति प्रकार, पद्धत, स्वरूप.

**भावइभावें**–अ. वाटल्यास, इच्छा असल्यास. [करणारा.

**भावक**–वि. घडवणारा, कल्पिणारा, हित करणारा, भावपूर्ण–अ. किंचित, थोडेंसें. –पु. भक्त, प्रेमी, विकाराचें चिन्ह.

**भावगति**–स्त्री. विचार, कल्पना, हेतु. इच्छा.

**भावज**–स्त्री. भावजय. –वि. कल्पनेंतून जन्मलेलें.

**भावता**–वि. आवडता. –पु. प्रियतम.

**भावताव**–पु. भाव, दराची घासाघीस,.

**भावती**–स्त्री. सुंदरी, प्रिय, प्रियतमा.

**भावदेना**–भावना तोंडावर दाखविणें.

**भावन**–वि. जाणणारा, पवित्र करणारा, प्रिय, आवडता, प्रवर्तक, वाढ करणारा, –पु. आविष्करण, आकार देणें, हेतु, वर्द्धन, कल्पना, ध्यान, दृढबुद्धि, तर्क, तपास, पर्यालोचन, निश्चय, निकाल, प्रत्यक्ष ज्ञान, पुरावा, सिद्धता, गुणन प्रकार, स्वभाव, तत्त्व, कृति, प्रयत्न, धात्वर्थ, क्रिया, सुगंधित करणें, भिजवून व खलून एकजीव करणें (औषधावरील संस्कार) अनुभवजन्य व स्मृति हेतु असा संस्कार. [चमकणें,

**भावना**–पु. विचार, भावना, इच्छा. –क्रि. अ. कळणें, पटणें, आवडणें, शोभणें,

**भावनी**–स्त्री. प्रिया, आवडती. [–वि. प्रिय.

**भावली**–स्त्री. खंड (शेतीचा).

**भावार्थ**–पु. तात्पर्य, अभिप्राय.

**भावी**–वि. संभाव्य, सुंदर, भविष्यकाळ, दैव, नशीब, निष्ठायुक्त.–पु. ब्रम्हनिष्ठ, ज्ञानी.

**भावुक**–वि. भावी, प्रत्यक्ष, सुखी, भावनाप्रधान, प्रेमळ, सुविचारी, मर्मज्ञ, रसिक, –पु.. वहिणीचा नवरा, कल्याण, क्षेम.

**भाषण, भाषित**–पु. भाषण, व्याख्यान, उद्गार. [भोजन करणें, खाणें.

**भाषना**–क्रि. अ. भाषण करणें, बोलणें,

**भाषा**–स्त्री. लक्षण, सरस्वती, लोकभिन्न लौकिक संस्कृत, फिर्याद, कैफियत, प्राकृत भाषा, बोली हिंदी भाषा, वाक्य, वाणी, करार, प्रतिज्ञा, व्याख्या.

**भाषी**–पु. बोलणारा.

**भास**–पु. तेज, कांति, कोंबडा, दीप्ति, प्रकाश, किरण, इच्छा, गिधाड, गौळवाडा.

**भासना**–क्रि. अ. प्रकाशमान् होणें, माहित होणें, समजणें, नजरेस येणें, रुतणें.

**भिगना**–क्रि. अ. भिजणें.

**भिगा (जा)ना**–क्रि. स. भिजविणें.

**भिडी**–स्त्री. भेंडी.

**भिंदि (डि)पाल**–पु. युद्ध करण्याचें एक [शस्त्र, गोफण.

**भिक्षा**–स्त्री. भीक, याचना, प्रार्थना, अन्न-पाणी, भिक्षेंत दिलेला किंवा मिळालेला पदार्थ, पगार, सेवा, भिक्षाक, भिक्षु, भिक्षुक. –पु. भिकारी, संन्यासी.

**भिखमंगा**–पु. भिकारी.

**भिखारी**–पु. भिकारी.

**भिखारिणी**–स्त्री. भिकारीण.

**भिखिया**–स्त्री. भिक्षा.

**भिगा (गो) ना**–क्रि. स. भिविजणें.

**भिच्छा, भिक्षा**–स्त्री. भिक्षा.

**भिजवाना**–क्रि. स. पाठविणें, रवानगी [करणें.

**भिजाना, भिजोना**–क्रि. स. भिजविणें.

**भिज्ञ**–वि. तज्ञ.

**भिटनी**–स्त्री. स्तनाची बोंडी, फुलाची [बैठक. –वि. लहानसें.

**भिटरियाना**–क्रि. स. आंत शिरणें.

**भिड़**–स्त्री. गांधीलामाशी.

**भिड़ना**–क्रि. अ. टक्कर होणें, लढणें, झगडणें, [चिकटणें.

**भितल्ला**–पु. अस्तर.–वि. आंतला, आंतील.

**भिताना**–क्रि. स. भिवविणें.

**भित्ति**–स्त्री. फोडलेली इ. वस्तु, भिंत, भय, आधार, तट, भाग, भेग, चीर, व्यंग, दोष, स्थान, प्रदेश, संधि, अवसर.

**भिद**–वि. (समासांतीं) फोडणारा, मारणारा, इ. –स्त्री. भेद, अंतर, फरक.

**भिदना**–क्रि. अ. टोंचणें, बोचणें, घायाळ होणें, शिरणें, घुसणें.

**भिदुर**–पु. वज्र, पिंपरी. –वि. मोडणारा फुटणारा इ., ठिसूळ, मिश्रित.

**भिनकना, भिनभिनाना**–क्रि. स. घोंघावणें. किळस येणें, भणभणणें.

**भिन (नु) सार**–पु. प्रभात, सकाळ.

**भिनही**–अ. पहाटेस, सकाळीं.

**भिन्न**–वि. विभागलेलें, मिश्रित, विविध, प्रफुल्लित, दुराचारी, कर्तव्यभ्रष्ट, रागावलेला, क्षुब्ध, रहित, दाणादाण झालेला, दुसरा, अलग, पृथक. –पु. अपूर्णांक, फूल, जखम, व्रण, तुकडा.

**भियना**– क्रि. अ. भिणें.

**भिरना, भिड़ना**–क्रि. स. भिडणें.

**भिंरिंग, भृंग**–पु. भंवरा, भुंगा.

**भिलनी**–स्त्री. भिल्लीण.

**भिलावाँ**–पु. भिलावा, बिब्बा.

**भिल्ल**–पु. रानटी मनुष्य, भिल्ल.

**भिश्त, भिस्त**–पु. स्वर्ग.

**भिश्ती, भिस्ती**–पु. पखाली.

**भींगना**–क्रि. अ. ओले होणें, भिजणें.

**भींचना**–क्रि. स. ओढणें, आवळणें, मिटणें.

**भींजना**–क्रि. अ. भिजणें, आनंदित होणें, स्नेह जोडणें, स्नान करणें, समावणें.

**भी**–स्त्री. भय, भयोत्पादक वस्तु.–अ. अवश्य, जरूर, अधिक, जादा, पर्यंत, [मुद्धां.

**भीउँ**–पु. भीम.

**भीख**–स्त्री. भीक.

**भीखन–भीषण**–वि. भीषण, भयानक.

**भीखना**–क्रि. भिक्षा मागणें.

**भीग (ज) ना**–क्रि. अ. भिजणें.

**भीटा**–पु. उंचवटा, पानमळ्याकरितां उंच केलेली जमीन.

**भीड़**–स्त्री. गर्दी, संकट, आपत्ति.

**भीड़ छँटना**–गर्दी कमी होणें.

**भीड़भड़क्का, भीड़भाड़**—फार गर्दी.
**भीड़ लगना**—गर्दी उसळणें.
**भीड़ना**—स्त्री. चोळण्याची किंवा भरण्याची [क्रिया.
**भीड़ा**—वि. संकुचित, भिडस्त.
**भीत**—वि. भ्यालेला, भित्रा.—स्त्री. भित चटई, गच्ची, पडदा.—पु. भय, भीति.
**भीत में दौड़ना**—शक्तीबाहेर काम करणें, आकाशाला गवसणी घालणें. [बोलणें.
**भीत के बिना चित्र बनाना**—वाह्यात
**भीतर**—अ. आंत.—पु. अंतःकरण, अंतःपूर.
**भीतर बाहर करना—भीतर देखना**,—सर्व काम करणें, देखरेख करणें.
**भीतरी**—वि. आंतील, गुप्त.
**भीति-भीती**—स्त्री. भय, भीति, थरकांप,
**भीन**—पु. सकाळ. [भित.
**भीनना**—क्रि. अ. भिनणें, भरून जाणें.
**भीना**—वि. भिजलेला.— पु. मेहुणा.
**भीनी**—वि. ओलें चिंब, बंद, मधुर.
**भीम**—वि. भयंकर, फार मोठा.—पु. आम्लवेतस, शंकर, भीमसेन.
**भीमा**—स्त्री. गोरोचन, चाबूक, दुर्गादेवी.
**भीर**—स्त्री. गर्दी, दुःख संकट, आपत्ति.—वि. भ्यालेला, भित्रा.
**भीरना**—क्रि. अ. घाबरणें, डरणें.
**भीरु**—वि. भित्रा, भिणारा.—पु. घुबड, कोल्हा, वाघ.—स्त्री. भित्री स्त्री, सावली, बकरी, घोण, गोम.
**भीरे**—अ. जवळ, समीप. [सुकलेली माती.
**भील**—पु. भिल्ल जात.—स्त्री. तलांवांतील
**भीलनी**—स्त्री. भिल्लिण.
**भीषज**—पु. वैद्य.
**भीषण**—वि. भयंकर, उग्र.—पु. भयानक रस, पारवा, कुत्रा, कांटे ताड, आघाडा, फार भीति. [भयानक रस, भीष्मपितामह.
**भीष्म**—वि. भयंकर.-पु. पिशाच, राक्षस, शंकर,
**भुँइ**—स्त्री. भुई, जमीन.
**भुँइहरा**—पु. तळघर.
**भुँजना**—क्रि. अ. भाजणें.
**भुअंग, भुजंग**—पु. भुजंग, सर्प.
**भुअ (व) न**—पु. भवन, मोठें घर.
**भुआर-ल**—पु. राजा.
**भुइँडोल**—पु. भूकंप. [दरिद्री, गरीब.
**भुक्खड़**—पु. भुकेलेला, बुभुक्षित, आधाशी,
**भुक्ति**—स्त्री. भोजन, लौकिक सुख, अधिकार, चालू वहिवाट, ग्रहाची रोजची गति.
**भुखमरा**—वि. भुकेकंगाल, उपासमार झालेला, आधाशी.
**भुखाना**—क्रि. अ. भूक लागणें.
**भुखाल**—वि. भुकेलेला. [अधिकार.
**भुगत**—स्त्री. भोजन, लौकिक सुख,
**भुगतना**—क्रि. स. भोगणें, सहन करणें —क्रि. अ. पूर्ण होणें. [निवाडा.
**भुगतान**—पु. परत फेड, भरपाई, निकाल,
**भुगताना**—क्रि. स. भोगावयास लावणें, व्यतीत करणें, घालविणें, परत फेड [करणें.
**भुगुति**—स्त्री. भोजन, आहार.
**भच्चड़**—वि. मूर्ख, बेअकली.
**भुजंग**—पु. सर्प, जार, गांडू, आश्लेषा नक्षत्र.
**भुज**—वि. (समासांती) खाणारा, भोगणारा, रक्षिणारा. (जसें महीभुज—भूमि रक्षिणारा) पु. हात, सोंड, फांदी, कड, वक्र रेषा, दोन शाखा, प्रांत, किनारा, त्रिकोणाची बाजू.
**भुज में भरना**—भेटणें, आलिंगन देणें.
**भुजदंड़**—पु. बाहुदंड.
**भुजबाथ**—पु. कूस, उत्संग.

संहिता, मद्र देशांतील एक शहर.
**शाकिर**—वि. संतुष्ट, कृतज्ञ. [करणारा.
**शाकी**—वि. निंदक, चहाडखोर, फिर्याद
**शाख़**—स्त्री. फांदी, तुकडा, एकाद्या वस्तूचें उपप्रकार, उप नदी, शिंग, हातपाय वगैरे, विलक्षण गोष्ट, एक पक्वान्न, संतति. [छळण्याच्या गोष्टी.
**शाख़साना**—पु. भांडण, कलंक, दोष, शंका,
**शाखा**—स्त्री. बाहु, भाग, रेखा, वेदाचा पोटभाग, पक्ष, तट, पारंबी.
**शागिर्द**—पु. शिष्य, सेवक.
**शागिर्दी**—स्त्री. सेवा, शिष्यत्व.
**शाज़**—वि. एकटा, अनुपम, नियमाविरुद्ध, असाधारण, अन्य, कधीं कधीं.
**शाज़ो नादिर**—अ. कधीं कधीं.
**शाद**—वि. आनंदी, परिपूर्ण, सुखी.
**शादबाश**—अ. खुश व्हा, शाब्बास.
**शादमान**—वि. प्रसन्न.
**शादाब**—वि. हिरवेंगार.
**शादियाना**—वि. मंगलवाद्य, अभिनंदन, जमिनदाराला लग्न प्रसंगीं कुळानें दिलेली भेट.
**शादी**—स्त्री. लग्न, आनंदोत्सव, आनंद.
**शान**—स्त्री. थाट, वैभव, मान, भव्यपणा, प्रतिष्ठा, अब्रू; कसोटीचा दगड, धारेचा दगड, करवत.
**(किसीको) शानमें**—दुसऱ्याच्या प्रतिष्ठेसाठीं, एकाद्या मोठ्या माणसाच्या संबंधांत.
**शान करना या दिखाना**—गर्व करणें.
**शानदार**—वि. शोभिवंत, भव्य.
**शानशौकत**—स्त्री. थाटमाट.
**शाना**—पु. खांदा, फणी.
**शानेसे शाना छिलना**—खांद्याला खांदा घासणें, फार गर्दी भासणें.
**शान्त**—वि. शांत केलेला, दूर झालेला, विझलेला, थांबलेला, मृत, माणसाळलेला, गडबड नसलेला, विकार रहित.
**शान्ति**—स्त्री. चित्ताची स्वस्थता, विश्रांति, विकार शून्यता, वैर थांबणें, विघ्न निवारक धार्मिक कर्म, समाधान, तडजोड, मंगल, पूर्वस्थितीवर येणें.
**शाप**—पु. शाप, शपथ, शिवी, उपद्रव.
**शाब**—पु. चोवीस ते ४० वर्षाच्या वयाचा
**शाबान**—पु. अरबी आठवा महिना. [पुरुष.
**शाबाश**—अ. वाहवा, फार छान.
**शाबाशी**—पु. प्रशंसा.
**शाम**—स्त्री. शेंबी, संध्याकाळ, सिरिया देश.
**शामत**—स्त्री. दुर्भाग्य, संकट. [—पु. श्रीकृष्ण.
**शामतका घेरा या मारा**-दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडलेला. [दुर्दैव ओढवणें.
**शामत आना, सवार होना या सिरपर खेलना**-
**शामा**—स्त्री. राधा, षोडशवर्षीय बालिका, यमुना, कोकिळ, काळी गाय, तुळस,
**शामियाना**—पु. चांदवा, तंबू. [ रात्र.
**शामिल**—वि. मिसळलेला, सामील. [देशचा.
**शामी**—स्त्री. सिरियाची भाषा.—वि. सिरिया
**शाम्मा**—पु. घ्राण शक्ति, वास घेण्याची शक्ति.
**शायक**—वि. शौकी, चैनी.-पु. बाण, तलवार.
**शायद**—अ. कदाचित, संभवतः.
**शायर**—पु. कवि.
**शायरा**—स्त्री. कवयित्री.
**शायरी**—स्त्री. काव्य, काव्यरचना.
**शाया**—वि. प्रगट, छापलेला, प्रकाशित.
**शारदा**—स्त्री. सरस्वती, दुर्गा, प्राचीन

काळची एक लिपि.
**शारीरिक**—वि. शरीरासंबंधी.
**शाल**—पु. एक वृक्ष, एक विशाल वृक्ष, एक मासा.-स्त्री. लोकरीची शाल.
**शालबोज़**—वि. शालीवर वेलबुट्टी काढणारा.
**शावक**—पु. छावा, पिलू.
**शासन**—पु. अंमल, हुकूम, निवाडा, इनामपत्र, करारपत्र, शास्त्र, इंद्रियनिग्रह, दंड, शिक्षा. —वि. शिकविणारें.
**शास्त्र**—पु. आज्ञा, धर्मग्रंथ, ज्ञान, शासन.
**शास्त्री**—वि. शास्त्रज्ञ, धर्मशास्त्राचें ज्ञान असलेला.
**शास्त्रीय**—वि. धर्मविषयक, शास्त्रविषयक.
**शाहंशाह**—पु. सम्राट, राजाधिराज.
**शाहंशाही**—स्त्री. सम्राटाचें पद किंवा कार्य.
**शाह**—पु. मूळ, स्वामी, मालक,वर (नवरामुलगा), महाराजा, मुसलमान फकीराची पदवी.-वि. मोठा, वजनदार, श्रीमंत.
**शाहज़ादा**—पु. युवराज, राजपुत्र.
**शाहज़ादी**-स्त्री. राजकन्या.
**शाहाना**—वि. शाही, सरकारी, उत्तम.—पु. वराचा पोशाख.
**शाहिद**—पु. साक्षीदार.—वि. सुंदर.
**शाही**—वि. राजाचा.—स्त्री. राज्य.
**शिंगरफ**—पु. हिंगूळ.
**शिंबी**—स्त्री. शेंग.
**शिंबीधान्य**—पु. द्विदळ धान्य.
**शिकंजा**—पु. पिळून काढण्याचें यंत्र, खोडा, कागद कापण्याचें यंत्र.
**शिकंजेमें आना**—तावडीत सांपडणें, हाल करणें.
**शिकन**—स्त्री. सुरकुती, चुणी, आठी.
**शिकम**—पु. पोट.
**शिकमपरवर**—वि. स्वार्थी.
**शिकमीकाश्तकार**—पु. मक्त्यानें शेत करणारा शेतकरी, पोट खंडकरी.
**शिकरा**—पु. एक ससाणा.
**शिकवा**—पु. गाऱ्हाणें.
**शिकस्त**—स्त्री. पराजय, खरडलेलें उर्दू लिखाण.
**शिकस्त खाना**—पराजित होणें.
**शिकस्तगी**—स्त्री. मोडतोड.
**शिकस्ता**—वि. मोडका तोडका.
**शिकायत**—स्त्री. गाऱ्हाणें, टोमणा, चुगली, निंदा, रोग.
**शिकार**—पु. मृगया, शिकार केलेलें जनावर, मांस, भक्ष्य, जाळ्यांत (पेचांत) अडकलेला माणूस.
**(किसीका) शिकार होना**—मारलें जाणें, बळी पडणें, फसणें.
**शिकारगाह**—स्त्री. शिकारीचें जंगल.
**शिकेब**—पु. सहनशीलता, धैर्य.
**शिक्षा**—स्त्री. शिक्षण, उपदेश, शिकवण, मंत्र, धाक, शिक्षा, दंड, अद्दल.
**शिखर**—पु. शिखर, टोक, देऊळ, किंवा घर याच्यावरील कळस, घुमट.
**शिखरन**—स्त्री. श्रीखंड.
**शिखा**—स्त्री. शेंडी, आगीची लपेट, टोक, शिखर, किरण, फांदी, एक विषम वृत्त.
**शिगाफ़**—पु. ऑपरेशन, चीर, छिद्र.
**शिगुफ्ता**—वि. पाहा 'शगुफ्ता'.
**शिगूफ़ा**—पु. फळी, नवीन गोष्ट.
**शिगूफ़ा खिलना**—नवें प्रकरण बाहेर येणें.
**शिताब**—अ. घाईनें.
**शिताबी**—स्त्री. शीघ्रता.
**शिथिल**—वि. सैल, मंद, थकलेला, आळशी, सोडलेला, गळलेला, दबलेला, अशक्त, गैरसावध, अर्धवट केलेले, कमी, बिलबिलीत.

**शिद्दत**–स्त्री. अधिकता, उग्रपणा, कठोरता, बलप्रयोग,
**शिनाख्त**–स्त्री. ओळख, परीक्षा.
**शिनास**–वि. ओळखणारा.
**शिप्पा**–पु. लग्गा.
**शिफर**–पु. ढाल.
**शिया**–पु. हजरत अलीला पैगंबराचा वारस मानणारा एक इस्लामी सम्प्रदाय.
**शिरकत**–स्त्री. हिस्सा, भाग, सहभागी होणें.
**शिरमौर**–पु. शिरोमणि, मुकुट, मुख्य.
**शिरहन**–पु. तक्क्या, उसें.
**शिराकत**–स्त्री. पाहा 'शराकत'.
**शिरीष**–पु. फूलकेशर. [योग्य.
**शिरोधार्य**–वि. आदरपूर्वक ग्रहण करण्या-
**शिरोमणि**–पु. शिरावर धारण करण्याचें रत्न.–वि. सर्वश्रेष्ठ.
**शिर्क**–पु. ईश्वराप्रमाणें दुसऱ्या देवतांना सृष्टि कर्ता मानण्याचें पाप.
**शिला**–स्त्री. शिळा, दगड, जातें, पाटा, धार लावण्याचा दगड, उंबरठा, तुळई, शिलाजीत.
**शिलालेख**–पु. दगडावर कोरलेला लेख.
**शिलीमुख**–पु. भुंगा, बाण, मूर्ख, युद्ध.
**शिल्प**–पु. करागिरी, कलासंबंधीं व्यवसाय.
**शिल्पी**–पु. कारागीर, गंवडी.-वि. कारागिरी
**शिवरानी**–स्त्री. पार्वती. [संबंधींचा.
**शिवाला, शिवालय**–पु. शिवमंदिर, तांबडी तुळस, शिवालय.
**शिविर**–पु. शिबीर, तंबू, किल्ला, छावणी.
**शिशिर**–पु. शिशिर ऋतु, हिंवाळा, दंव, बर्फ.-वि. थंड, ताप नाहींसा करणारें, शिशिर ऋतूंतील. [शेंडी.
**शिष**–पु. शिष्य, वध, हिंसा.-स्त्री. उपदेश,
**शिष्ट**–वि. सभ्य, उत्तम, धर्मशील, शांत, सुशील, बुद्धिमान, राहिलेलें, शिकवलेला, सुशिक्षित.
**शिष्टता**–स्त्री. सभ्यता, उत्तमपणा.
**शिष्टाचार**–पु. उत्तम व्यवहार, आदर सत्कार, नम्रता, दिखाऊ, सभ्य व्यवहार.
**शिष्य**–पु. चेला, क्रोध, जुलूम, विद्यार्थी.–वि. शासन करण्यास योग्य.
**शिस्त**–स्त्री. लक्ष्य (शस्त्राचें), गळ (मासे धरण्याचा).
**शीआ–या**–पु. सहाय्यक, शियापंथी लोक.
**शीकर**–पु. कण, तुषार, सरल, द्रव, वायु.
**शीत**–वि. आळशी, मूर्ख, थंड.-पु. थंडी, थंडीचे दिवस, दवबिंदू, सर्दी.
**शीतला**–स्त्री. देवी (रोग), शीतला देवी.
**शीर**–पु. दूध, क्षीर, अजगर, नांगर.
**शीरगर्म**–वि. साधारण गरम, कोमट.
**शीरमाल**–स्त्री. एका जातीची खमीर घातलेली पोळी.
**शीरा**–पु. पाक, लहान रक्तनाडी, जलधारा.
**शीराज़ा**–पु. पुस्तकाच्या बांधणीचा दोरा,
**शीरीं**–वि. गोड, प्रिय. [व्यवस्था.
**शीरीनी**–स्त्री. मिठाई, मिष्टान्न, गोडी, शेरणी. [तांबडा शेवगा, वाळा.
**शीघ्र**–अ. जलद, त्वरित, वेगवान. –पु.
**शीघ्रता**–स्त्री. जलदी.
**शीर्ष**–पु. कृष्णागरु, शीर, शिखर, समोरचा भाग, मुख्य खातें, डोकें.
**शीर्षक**–पु. डोकें, मथळा, टोप, शिरस्त्राण, डोक्याची कवटी, हुकूमनामा.
**शील**–पु. अजगर, आग्रह, शील, स्वभाव, चरित्र.-वि. प्रवृत्त, तत्पर.
**शीश**–पु. पाहा 'शीर्ष'.

**शीशम**–पु. शिशवीचें लाकूड किंवा झाड.
**शीशमहल**–पु. आरसे महाल.
**शीशा**–पु. कांच, आरसा, झुंबर.
**शीशी**–स्त्री. बाटली.
**शीशी सुंघाना**–भूल देणें.
**शीस**–पु. डोकें.
**शुआ,शुआअ**–स्त्री. सूर्यकिरण.
**शुकराना**–पु. आभार, उपकृत होण्याबद्दल दिलेलें धन, वस्तु इत्यादि.
**शुक्र**–पु. शुक्राचार्य, सामर्थ्य, शुक्रवार, अग्नि, वीर्य, कृतज्ञता, धन्यवाद.
**शुक्रगुज़ार**–वि. आभारी, कृतज्ञ.
**शुक्रगुजारी**–स्त्री. आभार प्रदर्शन.
**शुक्रिया**–पु. आभार.
**शुग़ल**–पु. पाहा 'शगल'.
**शुजाअ, शुजा**–वि. वीर, शूर.
**शुजाअत**–स्त्री. वीरता, शौर्य.
**शुतुर**–पु. उंट. [विचारहीन काम करणारा.
**शुतुर बेमहार**–वि. बिनवेसणाचा उंट,
**शुतुरमुर्ग़**–पु. शहामृग.
**शुद**–वि. व्यतीत.-पु. कार्यारंभ.
**शुदनी**–स्त्री. भवितव्य.-वि. संभाव्य.
**शुदबुद**–स्त्री. एकाद्या विषयाचें थोडेसें [ज्ञान.
**शुदा**–वि. झालेलें, होऊन गेलेलें.
**शुद्ध**–वि. पवित्र, स्वच्छ, बरोबर, शुद्ध, पांढरें, निर्दोष, प्रामाणिक, एकटा.
**शुद्धता**–स्त्री. पवित्रपणा, स्वच्छता, प्रामाणिकपणा, बिनचूकपणा.
**शुद्धि**–स्त्री. स्वच्छता, शुद्धता, प्रायःश्चित्त.
**शुफ़ा**–पु. शेजार.
**शुबहा, शुभा**–पु. शंका, संशय, भ्रम.
**शुभ**–वि. तेजस्वी, सुंदर, कल्याणकारक, न्याय्य.–स्त्री. कांती, सौंदर्य, इच्छा, देवसभा, शमी.–पु. सुख, कल्याण.
**शुभचिंतक**–वि. शुभेच्छा करणारा.
**शुमार**–पु. गणना, संख्या, हिशेब.
**शुमारी**–स्त्री. मोजणी.
**(मर्दुम)शुमारी**–मनुष्य गणना.
**शुमाल**–स्त्री. उत्तर दिशा.
**शुमूल**–वि. पूर्ण.
**शुरू**–पु. आरंभ, आरंभस्थान.
**शुर्ब**–पु. पिणें. [खुशामत.
**शुश्रूषा**–स्त्री. श्रवणेच्छा, उपासना, सेवा,
**शुल्क**–पु. हुंडा, फी, कर, भाडें, किंमत.
**शुष्क**–वि. सुकलेलें, कृश, ढोंगी, निष्फळ, अकारण, कठोर.
**शुस्तोशू**–स्त्री. आंघोळ, धुऊन पुसून [स्वच्छ करणें.
**शूची**–स्त्री. सुई.
**शून्य**–वि. रिकामें, निर्जन, खिन्न, भ्रमिष्ट, अमंगल, अर्थशून्य, तुच्छ.-स्त्री. नळी, वांझ स्त्री.–पु. पोकळी, आकाश, अभाव, अनुस्वार, बिंदू, निर्जन स्थान.
**शूप, शूर्प**–पु. सूप, दोन द्रोण (माप).
**शूम**–वि. कंजूष, अभागी, वाईट.
**शूर**–पु. वीर, योद्धा.
**शूरता, शूरताई**–स्त्री. शौर्य.
**शूरा**–पु. सामंत, शूर, सूर्य.
**शूद्र**–पु. हिंदूच्या चार वर्णांपैकीं शेवटचा वर्ण, या वर्णाचा मनुष्य.
**शूल**–पु. सूळ, लांब आणि टोकदार कांटा,
**शूलना**–क्रि. स. सलणें. [कळ, पिडा.
**शूस्ता**–वि. धुतलेला, स्वच्छ, शुद्ध.
**शृंगार**–पु. सजण्याची क्रिया, साहित्यांतील एक रस, स्त्रियांचें सजणें, शोभा वाढवण्याची वस्तु.

**शृंगारना**—क्रि. स. सजविणें.
**शृंगारहाट**—स्त्री. वेश्या राहण्याचें ठिकाण.
**शेख**—पु. पैगंबराच्या वंशजांची पदवी, श्रेष्ठ, बाटून झालेला मुसलमान.
**शेखचिल्ली**—पु. एक कल्पित मूर्ख व्यक्ति, मोठमोठीं मनोराज्यें करणारा.
**शेखी**—स्त्री. घमेंड, ऐट. [उतरविणें.
**शेखी झाड़ना, निकालना या भुलाना**—नक्षा
**शेखी बघारना, मारना या हाँकना**—टेंभा.
**शेखीबाज**—वि. गर्विष्ठ. [मिरविणें.
**शेफ़ता**—वि. आसक्त.
**शेर**—पु. बिब्या वाघ, सिंह, साहसी व्यक्ति, उर्दू कवितेचे दोन चरण.
**शेर होना**—धाडशी होणें.
**शेरखवानी**—पु. कवितावाचन.
**शेरदहाँ**—वि. व्याघ्रमुखी.—पु. पुढें रुंद व मागल्या बाजूस निमुळतें होत जाणारें
**शेरनी**—स्त्री. सिंहीण. [घर.
**शेरपंजा**—पु. वाघनख.
**शेरबबर**—पु. सिंह, केसरी सिंह.
**शेरवानी**—स्त्री. लांब पायघोळ आंगरखा.
**शेवा**—पु. प्रकार, प्रथा.
**शेवाल**—पु. शेवाळ.
**शेष**—पु. बाकी, समाप्ति, शेषनाग, लक्ष्मण. —वि. शिल्लक राहिलेलें, समाप्त.
**शेषनाग**—पु. हजार फणा असलेला नाग.
**शै**—स्त्री. वस्तु, भूतप्रेत.
**शैतनत**—स्त्री. दुष्टपणा.
**शैतान**—पु. सैतान, दुष्ट, भूतप्रेत.
**शैतानकी आँत**—लांबच लांब वस्तु.
**शैतानी**—स्त्री. पाजीपणा, हलकटपणा, दुष्टता. —वि. सैतानाचा, दुष्ट.
**शैतानी चर्खा**—भानगडीची गोष्ट.
**शैदा**—वि. आसक्त झालेला. [नेचा प्रकार.
**शैली**—स्त्री. चाल, प्रकार, रीत, वाक्यरच-
**शैलेय**—वि. खडकाळ, टणक.-पु. सिंह, भ्रमर, शिलाजित, शेंदेलोण, धूप.
**शैव**—वि. शंकराचें.-पु. शिवभक्त, धोत्रा.
**शोक**—पु. दुःख, खेद.
**शोख**—वि. उद्धट, चंचल, चमकदार (रंग).
**शोखी**—पु. धीटपणा, चंचलता, रंगाची-
**शोच**—पु. दुःख, चिंता. [चमक, दुष्टता.
**शोचनीय**—वि. दुःखकारक, अत्यंत वाईट.
**शोध**—पु. दुरुस्ती, फेड, परीक्षा, तपास.
**शोधक**—वि. शोध करणारा, सुधारक, तपास
**शोधना**—क्रि. स. शुद्ध करणें. [करणारा.
**शोब**—पु. धुलाई.
**शोबदा**—पु. जादू, कपट.
**शोबा**—पु. समूह, विभाग, कालवा.
**शोभन**—वि. सुंदर, शोभिवंत, उत्तम, शुभ.—पु. अलंकार, कल्याण, सुंदरता.
**शोभा**—स्त्री. कांति, सुंदरता, सजावट, एक छंद. [मीठ, जमीन.
**शोर**—पु. गोंगाट, कोलाहल, ख्याति, क्षार,
**शोरबा**—पु. रसा, सुरवा.
**शोरा**—पु. सोरा, क्षार.
**शोरापुश्त**—वि. उद्धट, भांडखोर.
**शोरिश**—स्त्री. गडबड, भांडण, खळबळ.
**शोरिदा**—वि. व्याकुळ.
**शोरीवासर**—वि. विक्षिप्त. [विचित्र गोष्ट.
**शोला**—पु. ठिणगी, ज्वाला, एक वृक्ष,
**शोला छोड़ना**—नवलाईचें बोलणें.
**शोलाख़**—वि. उग्र स्वभावाचा.
**शोला रू**—वि. स्वरूपवान. [गोष्ट.
**शोशा**—पु. बाहेर आलेलें टोंक, आश्चर्यजनक

**शोषण**—पु. सुकविणें, क्षीण करणें, नाश करणें, कामदेवाच्या एका बाणाचें नांव, श्रमाचा लाभ एकानेंच उपभोगिणें.
**शोहदा**—पु. गुंड, सोदा, लंपट.
**शोहरत**—स्त्री. कीर्ति, प्रसिद्धि, दंतकथा.
**शोहरा**—पु. दंतकथा, कीर्ति, प्रसिद्धि.
**शौक**—पु. आवड, छंद, लालसा, व्यसन, [प्रवृत्ति.
**शौक करना**—उपभोगणें.
**शौकसे**—खुशाल.
**शौकत**—स्त्री. थाट, वैभव, करामत, सामर्थ्य, [प्रतिष्ठा.
**शौकिया**—खुशीनें.
**शौक़ीन**—पु. नट्टापट्टा केलेला, शोकी.
**शौक़ीनी**—स्त्री. सजण्याची क्रिया.
**शौत**—स्त्री. सवत.
**शौहर**—पु. पति, स्वामी.
**श्मशान**—पु. स्मशान.
**श्मशानमाई**—स्त्री. मरीआई.
**श्याम टीका**—पु. तीट, गालबोट.
**श्यामता**—स्त्री. काळेपणा, सांवळेपणा.
**श्यामा**—स्त्री. राधा, एक काळा पक्षी, सोळा वर्षांची युवती, काळ्या रंगाची गाय, यमुना नदी, रात्र, स्त्री.-वि. काळी,
**श्रम**—पु. मेहनत, थकवा, खेद, कसरत, [तप, आश्रम.
**श्रमण**—पु. बौद्ध वा जैन साधु.
**श्रमजीवी**—पु. मेहनत करणारा, मजूर.
**श्रद्धा**—स्त्री. विश्वास, धर्मश्रद्धा, सन्मान, आशा, मत, डोहाळे.
**श्रद्धालु**-वि. विश्वास ठेवणारा, इच्छिणारा.
**श्रद्धेय**—वि. विश्वासार्ह.
**श्रवना**—क्रि. अ. वाहणें, थेंब थेंब गळणें. —क्रि. स. गाळणें, वाहविणें.
**श्राद्ध**—पु. श्रद्धापूर्वक केलेलें काम, पितृपक्ष.
**श्रावगी**—पु. दिगंबर जैन धर्मानुयायी.
**श्री**—स्त्री. लक्ष्मी, सरस्वती, धन, विभूति, [शोभा, कांति.
**श्रीखंड**—पु. गंध, चंदन, श्रीखंड.
**श्रीमती**—स्त्री. श्रीमानचें स्त्रीलिंगी रूप, [लक्ष्मी, राधा.
**श्रीमान**—पु. धनवान, श्रीयुत.
**श्रीयुत**—श्रीयुक्त.-वि. श्रीयुत.
**श्रृंखला**—स्त्री. सांखळी.
**श्रेणी**—स्त्री. वर्ग, इयत्ता, कोटि, क्रम, ओळ, परंपरा, समूह, सेना, सांखळी, व्यापारी मंडळी (कंपनी), जिना.
**श्रेय**—वि. अधिक चांगला, श्रेष्ठ.-पु. चांगलेपणा, कल्याण, सदाचार, यश.
**श्रेयस्कर**—वि. शुभदायक.
**श्रेष्ठ**—वि. सर्वोत्तम, मुख्य, पूज्य.-पु. कुबेर, विष्णु, ब्राह्मण, राजा, गाईचें दूध.
**श्रेष्ठता**— स्त्री. प्रधानता, सर्वोत्तमता, [पूज्यता.
**श्रौन**—पु. पाहा 'श्रवण.
**श्लथ**—वि. सैल, मंद, दुबळा, बांधलेलें, अस्ताव्यस्त. [(साहित्यांत).
**श्लिष्ट**—वि. मिसळलेला, श्लेषयुक्त
**श्लील**—वि. उत्तम, शुभ, सभ्योचित.
**श्लेष**—पृ. संयोग, एका शब्दाचे दोन किंवा अधिक अर्थ होणें.
**श्लेष्मज्वर**—पु. इन्फ्लुएंझा ताप.
**श्लैष्मा**—पु. कफ.
**श्लोक**—पु. शब्द, स्तुति, कीर्ति, संस्कृत पद्य.
**श्वास**—पु. श्वास, दमा, श्वासोच्छ्वास, [सुस्कारा, वायु.
**श्वासा**—स्त्री. श्वास.
**श्वेत**—वि. पांढरा, स्वच्छ, गोरा.-पु. शुक्र (ग्रह), कवडी, कैलास, पारवा, हंस, रुपें.

## [ष]

**ष**—पु. केश, ध्वंस, शेष, निर्वाण, स्वर्ग. —वि. [सुंदर, श्रेष्ठ.
**षक**—व. सहा.—पु. एक राग.

**षंजन**–पु. आलिंगन, समागम.

**षटक**–पु. सहांचा समुदाय.

**षंड,षंडक**–पु. बैल, पोळ, नपुंसक, समुदाय.

**षंडाली**–स्त्री. कामुक स्त्री, ३ छटांक तेलाचे माप. [पाय असलेला.

**षट्चरण**–पु. भुंगा, ढेंकुण, टोळ.-वि. सहा

**षट्राग**-पु. भैरव, मल्हार, श्रीराग, हिंडोल, मालकंस, दीपक हे सहा राग.

**षट्दर्शन**–पु. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक मीमांसा,वेदांत हे सहा दर्शन[जरा,मृत्यु.

**षट्पदी**–स्त्री. भूक, तहान, शोक, मोह,

**षडंग, छःअंग**–पु. २ जाँघें, २ बाहु, छाती, मस्तक, हीं सहा अंगें. [धर्म.

**षड्गुण**–पु. ऐश्वर्य, ज्ञान, यश,स्त्री, वैराग्य,

**(राजाके) षड्गुण**–पु. संधि, विग्रह, यान, संश्रय, आसन, द्वैधीभाव.

## [ स ]

**सं**–अ. एक अव्यय (याचा उपयोग शोभा, समानता, संगति, उत्कृष्टता, निरंतरता इ. सूचित करण्याकडे होतो).

**सँइतना**–क्रि. स. सारवणें, संचय करणें,

**संक**–स्त्री. शंका, भय, श्रम. [सांभाळणें.

**संकट**–वि. अरुंद.–पु. दुःख, खिन्न, विपत्ति.

**संकटा**–स्त्री. एक देवी, ज्योतिषांतील एक

**संकना**–क्रि. अ. शंका घेणें, भिणें. [स्थिति.

**संकर**–पु. दोन वस्तु एकत्र होणें, शंकर, दोन भिन्न जातीच्या मातापित्यापासून

**संकरघरनी**-स्त्री. पार्वती. [उत्पन्न झालेला.

**सँकरा**–वि. बारीक व अरुंद.–पु. कष्ट.

**संकरात**–स्त्री. संक्रांत. –[स्त्री. सांखळी.

**संकल**–स्त्री. सांखळी, दावें.

**संकलन**–पु. संग्रह, बेरीज, अनेक ग्रंथांतून चांगले चांगले विषय निवडण्याची क्रिया.

**संकलित**–वि. निवडलेला, एकत्र केलेला.

**संकल्प**–पु. कार्य करण्याची इच्छा, दृढनिश्चय, देव कार्य करण्याच्या आधीं मंत्राचा उच्चार करून आपला निश्चय

**संका**–स्त्री. शंका. [प्रगट करणें.

**संकार**–पु. खूण.

**संकाश**–अ. समान, जवळ.–पु. प्रकाश.

**संकीर्ण**–वि. संकुचित, क्षुद्र, मिश्रित.–पु. मिश्र राग, संकट, एक प्रकारचें गद्य.

**संकीर्णता**–स्त्री. कुढेपणा, संकोच.

**संकु**–स्त्री. बरची.

**सँकुचना**–क्रि. अ. पाहा 'सकुचना.'

**सँकुचाना**–क्रि. अ. लाजणें, आखडणें.–क्रि. स. मिटणें (फूल).

**संकुल**–वि. दाट, परिपूर्ण.-पु. लढाई, समूह, गर्दी, परस्पर विरोधी वाक्य.

**संकेत**–पु. इंगित, खूण. [टाकणें.

**संकेतना**–क्रि. स. इंगित करणें, संकटांत-

**संकोच**–पु. आखडण्याची क्रिया, लाज, भय,

**संकोचना**-क्रि.स. संकोच करणें. [टाळाटाळ.

**संकोची**–वि. संकोच बाळगणारा, लाजाळू.

**संक्रांति**–स्त्री. संक्रांत.

**संक्रामक**–वि. संसर्गजन्य.

**संक्षिप्त**–वि. थोडक्यांत असलेला, थोडा.

**संक्षेपना**–क्रि. स. थोडक्यांत एकादी गोष्ट सांगणें, कमी करणें.

**संख**–पु. शंख, मूर्ख, एक जलजंतु.

**संखिया**–पु. एक प्रकारचें विष.

**संख्या**–स्त्री. अंक, संख्या, मोजणी.

**संग**–पु. दगड, सहवास, मिलन, आसक्ति, विषयाबद्दलचें प्रेम.-अ. बरोबर.–वि.

**(किसीके) संग लगना**-मागें लागणें. [कठोर.

**संग अराहत**–पु. एक गुळगुळीत पांढरा दगड (यानें घाव लवकर भरून येतो.)
**संगठन**–पु. एकीकरण, एकीकरणानें बनलेली संस्था.
**संगत**–स्त्री. सोबत, बरोबर राहणारा, उदासी साधूंचा मठ, संबंध.
**संगतरा**–पु. संत्रें.
**संगतराश**–पु. पाथरवट.
**संगतिया**–पु. गाण्यांतील साथीदार.
**संग दिल**–वि. निर्दय, कठोर हृदय.
**संगम**–पु. संयोग, दोन नद्यांचें संगमस्थान, [सोबत.
**संगमर्मर**–पु. संगमरवरी दगड.
**संगमूसा**-पु. एका जातीचा काळा गुळगुळीत किमती दगड. [दगड.
**संगयशब**–पु. एक प्रकारचा हिरवा किमती
**संगरा**–पु. दगड उचलण्याचा वेळू, विहिरीस [पंप लावण्याचें भोक.
**संगराम**–पु. युद्ध.
**संगसार**–पु. इस्लामी धर्माप्रमाणें व्यभिचाऱ्याला द्यावयाची शिक्षा (कमरेपर्यंत जमिनींत गाडून डोक्यावर दगड फेकून ठार मारणें).
**संग्रह**–पु. एकत्र करणें, रक्षण, विवाह, ग्रहण करण्याची क्रिया, अनेक विषय एकत्र केलेला ग्रंथ.
**संगाती**–पु. मित्र, साथी.
**संग्राम**–पु. लढाई. [णारी.
**संगिन, संगिनी**–स्त्री. सखी, बरोबर अस-
**संगी**–पु. मित्र, सोबती.–स्त्री. एक प्रकारचें कापड.-वि. दगडी.
**संगीत**–पु. गाणें, नाचणें व वाजवणें.
**संगीन**–वि. दगडी, मजबूत, लठ्ठ, बिकट. –पु. बंदुकीच्या टोकाला लावलेलें लोखंडी शस्त्र.
**संगीसाथी**–वि. दृढ, टिकाऊ, दगडी.–पु. सोबती.
**संगेअसवद**–पु. काब्याचा काळा पवित्र [दगड.
**संगेपारस**–पु. परीस.
**संगोतरा**–पु. संत्रें.
**संगृहीत**–वि. संकलित.
**संघ**–पु. समिति, समुदाय, बुद्धांचा धर्मसंघ, मठ, प्राचीन भारताचें प्रजातंत्र राज्य.
**संघट्ट**–पु. मेल, संघटन, लढाई, ढीग.
**संघठन**–पु. संयोग, रचना, बनावट.
**संघ (घा) रना**-क्रि. स. संहार करणें, मारणें.
**संघर्ष, संघर्षण**–पु. टक्कर, स्पर्धा.
**संघात**–पु. समूह, आघात, वध, शरीर,
**संघाती**–पु. मित्र, सहचर. [निवासस्थान.
**संघार**–पु. संहार, प्रलय, नाश.
**संच**–पु. संचय, देखरेख.
**संचकर**–वि. कंजूष, संचय करणारा.
**संचय**–पु. सांठा, संग्रह.
**संचार**–पु. चालणें, पसरणें.
**संचारी**–पु. हवा, साहित्यांत मुख्य भावनांना पुष्टी देणारे भाव, व्यभिचारी भावना.-वि. गतिशील. [सुरू ठेवणें.
**संचालन**–पु. चालविण्याची क्रिया, काम
**संछेप**–पाहा 'संक्षेप'.
**संजम, संयम**–पु. संयम.
**संजात**–वि. उत्पन्न, प्राप्त.
**संजाफ**–स्त्री. किनार, गोठ.-पु. अर्धा लाल व अर्धा पांढरा घोडा.
**संजाब**–पु. पाहा 'संजाफ'.
**संजीदगी**–स्त्री. गंभीरपणा.
**संजीदा**–वि. गंभीर, समजूतदार.
**संजुक्त, संजुत**–वि. संयुक्त.
**संजुक्ता**–स्त्री. राणी संयोगिता.
**संजुग**–पु. युद्ध.

**संजोई**–अ. सह, बरोबर.
**संजोइल**–वि. सुसज्ज, एकत्रित.
**संजोऊ**–पु. सामुग्री, सिद्धता.
**संजोग**–पु. संयोग. [सजविणें.
**संजोना-वना**–क्रि. स. एकत्रित करणें,
**संजोवल**–वि. सजविलेलें, सुसज्ज संचित, सेनेसहित, सावधान.
**सँझला**–वि. संध्याकाळचें.
**सँझवत-वाती**–स्त्री. सांजवात, सायंस्तोत्र.
**संझा**–स्त्री. संध्याकाळ.
**संझोखा**–पु. संध्याकाळ.
**संठेका मुठ्ठा**–पु. नरराक्षस.
**संड**–पु. सांड, पोळ.
**संडमुसंड**–वि. खूप लठ्ठ.
**सँडसा**–पु. सांडशी.
**सँडसी**–स्त्री. सांडशी.
**संडा**–वि. माजलेला.
**संत**–पु. महात्मा, ईश्वरभक्त, एकवीस मात्रांचा एक छंद. [पुष्कळ.
**संतत**–वि. निरंतर, विस्तृत, व्यापणारें,
**संतति**–स्त्री. मुलेंबाळें, प्रजा, विस्तार, परंपरा, ओळ, ढीग, कायमपणा, वेश.
**संतरा**–पु. संत्रें, मोसंबी.
**संतरी**–पु. पहारेकरी, द्वारपाल.
**संतान**–पु. कल्पवृक्ष. पाहा 'संतति'.
**संताप**–पु. आंच, दुःख, मानसिक कष्ट, क्रोध, पश्चात्ताप.
**संतापना**–क्रि. स. दुःख देणें.
**संती**–अ. ऐवजीं, द्वारा.-पु. पणतू.
**संतोष-ख**–पु. समाधान, तृप्ति, प्रसन्नता.
**संतोषना**–क्रि. स. संतुष्ट करणें.-क्रि. अ.
**संद**–पु. जोडा, फट, दाब. [संतुष्ट होणें.
**संदल**–पु. चंदन.
**संदली**–वि. चंदनी, पिवळें.-पु. फिक्कट पिवळा रंग, एक प्रकारचा हत्ती, घोड्याची एक जात
**संदिग्ध**–वि. संदेहपूर्ण, शंका असलेलें.
**संदूक**–पु. पेटी.
**संदूकचा**–पु. लहान पेटी.
**संदूकची-ड़ी**–स्त्री. लहान पेटी.
**संदूर**–पु. शेंदूर.
**संदेश**–पु. आज्ञा, निरोप, बातमी, एक प्रकारची बंगाली मिठाई.
**संदेस**–पु. समाचार, एक प्रकारची बंगाली
**संदेसन खेती**–तोंड पाटिलकी. [मिठाई.
**संदेसा**–पु. समाचार.
**संदेसी**–पु. दूत.
**संदेह**–पु. संशय, एक अर्थालंकार, धोका.
**संदेहमें**–अ. संशयावरून.
**संदोह**–पु. समूह, दूध काढणें, दूध.
**संध**–स्त्री. पाहा 'संधि'.
**संधना**–क्रि. अ. जोडलें जाणें.
**संधान**–पु. निशाण, लक्ष्य, शोध, संयोग, ऐक्य, सांधा, विचार, योजणें, लोणचें, मद्य, कांजी, व्रण बरा होणें, कासें.
**संधाना**–पु. लोणचें.
**संधि**–स्त्री. संयोग, जोड, तह, मैत्री, सांधा, व्याकरणांतील संधि, चोरी करण्याकरितां भिंतीला पाडलेलें छिद्र, मधली रिकामी जागा.
**संध्या**–स्त्री. संधिकाल, सायंकाळ, आर्यांची दिवसांतून तीन वेळां करावयाची उपासना, संध्योपासना.
**संन्यास**–पु. संन्यास (चार आश्रमांतील शेवटचा आश्रम), त्याग ठेव.

**संन्यासी**—पु. संन्यासाश्रमाच्या नियमांचे पालन करणारा.
**संपत्ति**—स्त्री. संपत्ति, वैभव.
**संपदा**—स्त्री. धन, वैभव.
**संपन्न**—वि. पूर्ण, सहित, युक्त, श्रीमंत.
**संपन्न होना**—पार पडणें, साजरा होणें, भरणें (सभा उत्सव इ.), श्रीमंत होणें.
**संपा**—स्त्री. वीज.
**संपात**—पु. संसर्ग, संगम, एकत्र मिळून खालीं पडणें, एक रेषा दूसऱ्या रेषेला ज्या ठिकाणीं मिळते तो बिंदू.
**संपाति-ती**—पु. गरुडाचा पुत्र, जटायूचा भाऊ, माली राक्षसचा पुत्र.
**संपादन**—पु. काम पूर्ण करण्याची क्रिया, दुरुस्त करणें, पुस्तकाचें संपादन करणें.
**संपुट**—पु. पात्राच्या आकाराची वस्तु, ठिकरी, द्रोण, डब्बा, ओंजळ, कोश.
**संपूर्णता**—अ. पूर्णपणें.
**सँपेरा**—पु. गारुडी.
**संपै**—स्त्री. संपत्ति.
**सँपोला**—पु. सापाचें पिलू.
**संप्रति**—अ. यावेळीं, तुलनेंत.
**संबंधि**—वि. संबंध ठेवणारा, विषयक. —पु. नातेवाईक, व्याही.
**संबद्ध**—वि. जोडलेलें, बंद, संबंधयुक्त.
**संबल**—पु. वाटखर्ची.
**संबाद**—पु. संवाद.
**संबुक**—पु. शिपला.
**संबुल**—स्त्री. एक गवत.
**संभल (र) ना**—क्रि. अ. सांभाळणें, सांवरणें, भानावर येणें, आघात किंवा हानीपासून बचाव करणें, कार्याचा भार उचलला जाणें, स्वस्थता प्राप्त करणें.
**संभव**—पु. जन्म, संयोग, होण्याजोगें, होणें.
**संभवतः**—अ. बहुतेक, संभवनीय.
**संभार**—पु. संचय, तयारी, संपत्ति, पालन-पोषण.
**सँभारना**—क्रि. स. सांभाळणें, आठवण करणें.
**सँभाल**—स्त्री. सांभाळ, देखरेख, पोषणाचा भार, शरीराची शुद्ध.
**सँभालना**—क्रि. स. सांभाळणें, ताब्यांत ठेवणें, पडू न देणें, रक्षण करणें, उद्धार करणें, पालन पोषण करणें, निर्वाह करणें, मनोवेग आवरणें.
**सँभालू**—पु. निर्गुडीचें झाड.
**संभावना**—स्त्री. संभव, अनुमान, प्रतिष्ठा, एक अलंकार.
**संभावित**—वि. कल्पित, जोडलेलें, संभव.
**संभू**—पु. शंकर.
**संभूत**—वि. बरोबर उत्पन्न झालेला, उत्पन्न, युक्त, सहित.
**संभूय**—अ. भागीदारींत.
**संभूय समुत्थान**—पु. भागीदारीचें काम.
**संभ्रांत**—वि. प्रतिष्ठित, घाबरलेला.
**संमत**—वि. मान्य.
**संमति**—स्त्री. अभिप्राय, मत, अनुमति.
**संयम**—पु. दाब, इंद्रियनिग्रह, बंधन, पथ्य.
**संयुक्त**—वि. जोडलेलें, सहित.
**संयुक्ता**—स्त्री. राणी संयोगिता.
**संयुग**—पु. संयोग, लढाई.
**संयोग**—पु. योगायोग, जोड, समागम, संबंध, विवाह संबंध, पुष्कळ गोष्टी एकत्र होणें.
**संयोगवश**—सहजगत्या, योगायोगानें.
**संयोजक**—वि. सभा बोलविणारा, एकत्र आणणारा, उभयान्वयी अव्यय.
**सँयोना**—क्रि. स. सजविणें.
**संरक्षण**—पु. रक्षण, देखरेख, ताबा.
**संलेख**—पु. दस्तऐवज.
**संवत**—पु. वर्ष, सन, महाराज विक्रमा-

दिरयांच्या काळापासून चालत आलेली [वर्ष गणना.
**संवनन**–पु. प्रेमप्रार्थना.
**संवर**–स्त्री. स्मरण, बातमी, हालहवाल.
**संवरना**–क्रि. अ. सजणें, दुरुस्त होणें. –क्रि. स. स्मरण करणें.
**संवरिया**–वि. सावळा, श्याम.
**संवाद**–पु. बातमी, चर्चा, प्रसंग, मामला.
**संवाददाता**–पु. बातमीदार.
**सँवार**–स्त्री. सजावट, रचना,नखरा, समाचार, झांकणें.
**संवारना**–क्रि. स. सजविणें, अलंकृत करणें, क्रमानें ठेवणें, काम बरोबर करणें.
**सँवारी**–स्त्री. सजवलेली, व्यवस्थित ठेव[लेली.
**संविदा**–पु. करार, भांग.
**संवेदन**–पु. अनुभव करणें, प्रगट करणें.
**संशय**–पु. शंका, भीति, एक काव्यालंकार.
**संशोधक**–पु. सुधारणारा, वाईटांतून चांगल्या स्थितींत आणणारा.
**संशोधन**–पु. शुद्धि, सुधारणा, कर्ज फेडणें.
**संशोधित**–वि. शुद्ध केलेला, सुधारलेला.
**संस, संसइ**–पु. संशय.
**संसद**–पु. पार्लमेंट. [पुरुषांचा संबंध.
**संसर्ग**–पु. संबंध, संसर्ग, सोबत, स्त्री
**संसय**–पु. पाहा 'संशय'.
**संसार**–पु. जग, मर्त्यलोक, गृहस्थी, एकामागून दुसऱ्या अवस्थेंत एक सारखें जाणें, वारंवार जन्म घेणें.
**संस्करण**–पु. आवृत्ति (पुस्तकाची),संस्कार, शुद्ध करणें, बरोबर करणें.
**संस्कार**–पु. सुधार, सजावट, उपदेश, संगत इत्यादिचा मनावर पडलेला प्रभाव, मागील जन्माच्या गोष्टींचा आत्म्यावर झालेला परिणाम,धर्मदृष्टया शुद्ध करणें.
**संस्कृत**–वि. संस्कार केलेला, साफ केलेला, सुधारलेला, सजविलेला, मुंज वगैरे संस्कार झालेला.–स्त्री. संस्कृत भाषा.
**संस्कृति**–स्त्री. शुद्धि, संस्कार, सजावट, सभ्यता.
**संस्था**–स्त्री. स्थिति, व्यवस्था,समाज, झुंड.
**संस्थापक**–पु. स्थापना करणारा.
**संसृति**–स्त्री. संसार, गति, भूलोक वास.
**संहत**–वि. संयुक्त, कठिण, दाट, मजबूत,
**संहर्ता**–वि. नाश करणारा. [एकत्र.
**संहार**–पु. एकत्र करणें, ओवणें, केसाची वेणी घालणें,नाश,समाप्ति, निवारण.
**स**–अ. सहित, बरोबर.-पु. ईश्वर, शिव, साप, पक्षी, वायु, जीवात्मा, चंद्र, ज्ञान.–उप. एक उपसर्ग.
**सआदत**–स्त्री. सद्भाग्य, सचोटी.
**सआदतमंद**–वि. भाग्यवान, आज्ञाधारक [(पुत्र).
**सइंया**–पु. स्वामी, पति, ईश्वर.
**सइंतना**–क्रि. स. जमविणें, राखणें.
**सइ**–अ. सह, बरोबर.
**सइसाँझ**–करकरीत तिन्ही सांजा.
**सइगर**–वि. फार, सगळें.
**सइराना**–क्रि. अ. पसरणें, वाढणें.
**सई**–स्त्री. प्रयत्न, धांवाधांव, शिफारस, वृद्धि, बढती.
**सईद**–वि. शुभ, चांगलें, भाग्यवान.
**सईस**–पु. घोड्याचा नोकर.
**सउँ**–अ. बरोबर, समोर.–स्त्री. शपथ.–वि. सारखा.–स. तो.–प्रत्य. करण व आपादान कारकाचा प्रत्यय.
**सऊबत**–स्त्री. संकट, अडचण.
**सऊर**–पु. रीति, व्यवहार.
**सक**–स्त्री. शक्ति, सामर्थ्य.–पु. संशय,

थाक, संवत्, यश, स्मारक, संधि, कीर्ति होण्याजोगें काम.
**सकट**—पु. गाडी, छकडा.
**सकत-ता**—स्त्री. शक्ति.-अ. यथाशक्ति.—पु. फेफरें, स्तब्धता, कवितेंतील यति, यतिभंगाचा दोष.
**सकता पड़ना**—यति भंग होणें.
**सकतेमें आना**—स्तंभित होणें.
**सकति-ती**—स्त्री. बळ, पराक्रम.
**सकना**—क्रि. अ. शकणें.
**सकपकाना**—क्रि. अ. आश्चर्यचकित होणें, लाजणें, गडबडणें, हलणें.
**सकर**—पु. नरक.
**सकरना**—क्रि. अ. कबूल होणें, मंजूर होणें.
**सकरपारा-ला**—पु. शंकरपाळें, त्या आकाराची शिलाई.
**सकरा**—वि. संकुचित.-पु. शिधा.
**सकरून**—वि. दयाळू. [प्रकृति.
**सकल**—वि. सर्व.—पु. निर्गुण ब्रह्म व सगुण
**सकलात**—पु. दुलई, भेट, नजराणा.
**सकसकाना,सकसाना**—क्रि. अ. थरथर कापणें, भयभीत होणें, शंकित होणें.
**सकाना**—क्रि. अ. भीति किंवा शंका करणें.
**सकार**—पु. सकाळ.
**सकारना**—क्रि. स. स्वीकार करणें, मुदत संपण्याच्या एक दिवस पूर्वी हुंडीवर
**सकारे**—अ. सकाळीं. [सही करणें.
**सकिलना**—क्रि. अ. सरकणें, संपूर्ण होणें.
**सकीम**—वि. आजारी, दूषित.
**सकील**—वि. पचावयास जड, वजनदार.
**सकुच**—स्त्री. संकोच, लाज.
**सकुचई,सकुचाई**—स्त्री. भीड, लाज.
**सकुचना**—क्रि. अ. संकोच करणें, लाजणें.
**सकुचाना**—क्रि. अ. संकोच करणें. —क्रि. स. लाजविणें, मिळविणें.
**सकुची**—स्त्री. एक तऱ्हेचा मासा.
**सकुन**—पु. पक्षी, शकुन.
**सकुनाधम**—पु. फार वाईट शकुन.
**सकुनी**—स्त्री. शकुंत पक्षी, एक नांव.
**सकून**—पु. स्थिरता, मनाची शांति.
**सकूनत**—स्त्री. निवासस्थान.
**सकेतना**—क्रि. अ. संकोचणें.
**सकेलना**—क्रि.स. एकत्र करणें, दाबणें, कसणें.
**सकेला**—स्त्री. एक तरवार.
**सकोच**—पु. पाहा 'संकोच'.
**सकोचना**—क्रि. स. संकोचणें.
**सकोची**—क्रि. भ्याली, लाजली, दाबली. —अ. गोळा करून. —वि. लाजाळू.
**सकोड़ना**—क्रि. अ. गोळा करणें.
**सकोतरा**—पु. मोसंबी.
**सकोरा**—पु. मातीचें भांडें, परळ.
**सकोरी**—स्त्री. मातीचा प्याला.
**सक्का**—पु. भिस्ती.
**सक्ति**—स्त्री. बळ, पौरुष.
**सक्तु,सक्तुक**—पु. सातु.
**सक़्फ़**—पु. घराचें छत, माडी.
**सक्र**—पु. इंद्र. [मुलगा).
**सक्रारि**—पु. मेघनाद (रावणाचा मोठा
**सकृत**—अ. एकवार, एके वेळीं, पूर्वी.
**सखर**—वि. कठोर, खरेपणासहित.
**सखरा**—पु. दाळ भात इ. चें साधें जेवण.
**सखा**—पु. साथीदार, मित्र, सहचर.
**सख़ावत**—स्त्री. उदारता, दान.
**सखी**—वि. दानी, उदार.—स्त्री. मैत्रीण.
**सखुआ**—पु. शालवृक्ष.
**सख़ुन**—पु. बोल, काव्य, उक्ति, उद्धरण.

**सखुनचीन**–वि. चहाडखोर.
**सखुनतकिया**–पु. बोलतांना संवयीमुळें तोंडीं बसलेला निरर्थक शब्द (उदा. जेहेत्ते, ज्याचें नांव तें, आपलें काय म्हणतात वगैरे).
**सखुनवों**–वि. काव्यरसिक, कवि.
**सखुनपरवर**–वि. वचन पाळणारा, हट्टी.
**सख्त**–वि. कठोर, कडक.–स्त्री. संकट.
**सख्ती**–स्त्री. क्रूरता, संकट, दृढता, तीव्रता, [धमकी, कष्ट.
**सग**–पु. कुत्रा.
**सगड़**–पु. बैलगाडी.
**सगनौती**–स्त्री. शकुनवंती.
**सगपन**–पु. सख्खेपणा.
**सगपहती**–स्त्री. एक प्रकारची भाजीत घालून शिजवलेली डाळ. [पट.
**सगबग**–वि. ओथंबलेला, परिपूर्ण.-अ. झट-
**सगबगाना**–क्रि. अ. भिजणें, मुरणें, भयभीत होणें, संशयी होणें.
**सगर**–पु. सूर्य वंशांतील एक राजा.
**सगरा-रा**–वि. सर्व, एकूणएक.
**सगरे**–सर्व. सगळे.
**सगलानि**–ग्लानीनें, तिरस्कारानें.
**सगा**–वि. सख्खा, गोत्रज.
**सगाई**–स्त्री. वाङनिश्चय, मागणी, नातें.
**सग़ीर**–वि. लहान, बालवयाची.
**सगुन**–पु. शकुन. [सांगणें.
**सगुनाना**–क्रि. स. शकुन पाहाणें, शकुन
**सगुनिया**–पु. फलज्योतिषी.
**सगुनी**–वि. शकुन पाहाणारा, ज्योतिषी.
**सगुनौती**–शकुन विचारणें.
**सगोती**–पु. सगोत्र, भाऊबंद.
**सघन**–वि. निबिड, भरीव.
**सच**–वि. खरें, यथार्थ.
**सचना**–क्रि. स. जोडणें, जमविणें, पूर्ण करणें, सजणें.
**सचमुच**–अ. खरोखर, वस्तुतः, अवश्य.
**सचरना**–क्रि. अ. प्रचलित होणें, पसरणें.
**सचाई**–स्त्री. सत्यता, खरेपणा.
**सचान**–पु. बाजपक्षी, ससाणा.
**सचिंत**–वि. काळजीयुक्त.
**सचिक्कण**–वि. अत्यंत गुळगुळीत.
**सचिव**–पु. मित्र, मंत्री, सहाय्यक.
**सची**–स्त्री. इंद्राची बायको.
**सचु**–पु. आनंद, सुख, प्रसन्नता.
**सचुपाई**–वि. संतुष्ट, मौन.
**सचेत**–वि. सावध.
**सचेष्ट**–वि. कर्मवंत, प्रयत्नशील.
**सचेष्टता**–स्त्री. क्रियाशीलता.
**सचौरी**–स्त्री. सत्यता, सजावट.
**सच्चा**–वि. खरें बोलणारा, यथार्थ, शुद्ध, [अगदीं बरोबर.
**सच्चाई**–स्त्री. खरेपणा.
**सच्चिदानंद**–पु. परमात्मा, ईश्वर.
**सच्छत**–वि. घायाळ.
**सच्छी**–पु. साक्षीदार. [क्रिया.
**सज**–स्त्री. शोभा, डौलदारपणा, सजण्याची
**सजग**–वि. सावध, जागृत.
**सजदार**–वि. सुंदर.
**सजधज**–स्त्री. थाटमाट.
**सजन**–पु. सज्जन, पति, प्रियतम.
**सजना**–क्रि. अ. शृंगारलें जाणें.–क्रि. स. शृंगार करणें, शोभा देणें.
**सजनि-नी**–स्त्री. सखी, सहचरी.
**सजवल**–पु. सिद्धता, तयारी.
**सजला**–पु. तिसरा भाऊ.-वि. जलयुक्त.
**सजवाई**–स्त्री. सजविण्याची क्रिया किंवा [मजुरी.
**सजवाना**–क्रि. स. सजवून घेणें.
**सजा**–स्त्री. शिक्षा, दंड.

**सजा**—पु. पक्ष्यांचा मधुर कलरव, छंद.
**सजाइ**—स्त्री. शिक्षा, दंड.
**सजाई**—स्त्री. सजविण्याची क्रिया किंवा मजुरी, सजविलेली.–अ. सजवून.
**सजाना**—क्रि.स. सजविणें,व्यवस्थित लावणें.
**सजाय**—स्त्री. शिक्षा, दंड.
**सजायाफ्ता**—वि. शिक्षा भोगलेला.
**सजायाब**—वि. शिक्षेला पात्र असलेला,
**सजाव**—पु. चक्का दही. [शिक्षा भोगलेला.
**सजावट**—स्त्री. शृंगार, सजविणें.
**सजावन**—पु. शृंगार, सजविण्याची क्रिया.
**सजावल**—पु. कर वसूल करणारा शिपाई.
**सजावार**—वि. शिक्षेला पात्र असलेला,
**सजीउ**—वि. जिवंत. [उपयुक्त, फलदायक.
**सजीला**—वि. सजलेला, सुंदर.
**सजीव**—वि. जिवंत, चपळ, तेजस्वी.
**सजीवन**—पु. संजीवनी.
**सजुग**—वि. सावध, हुशार.
**सजूरी**—स्त्री. एक प्रकारची मिठाई.
**सजोना**—क्रि. स. सजविणें, क्रम लावणें.
**सजोयल**—वि. सजविलेलें, संचित.
**सज्जन**—पु.चांगला मनुष्य, आवडता मनुष्य, सजविण्याचें काम.
**सज्जा**—वि. सजावट, वेषभूषा.-स्त्री. पलंग, मेलेल्या माणसाच्या नांवानें ब्राम्हणास शय्यादान देण्याची क्रिया.
**सज्जादा**—पु. नमाज पढण्याची चटई, फकीराची उशी. [युक्त.
**सज्जित**—वि. सजलेला, आवश्यक वस्तूनीं
**सज्जी**—स्त्री. पांढऱ्या रंगाचा एक क्षार.
**सज्या**—स्त्री. शय्या, पलंग.
**सटक**—स्त्री. हळूच निघून जाण्याची क्रिया, तंबाखू पिण्याची नळी, बारीक छडी.
**सटकना**—क्रि. अ. निसटणें.
**सटकाना**—क्रि. स. छडी किंवा चाबकानें मारणें, गिळून टाकणें, पळवून लावणें.
**सटकारना**—क्रि. स. सटासट मारणें.
**सटकारा**—वि. लांब व मऊ (केस).
**सटकारी**—स्त्री. बारीक छडी. [बाजू भिडणें.
**सटना**—क्रि. अ. चिकटणें, मारपीट होणें,
**सटपट**—स्त्री. शील, चुटपुट, संकोच, गोंधळ.
**सटपटाना**—क्रि. अ. संकोचित होणें, चुटपुटणें, संशयांत पडणें, फिक्के पडणें, किंकर्तव्यमूढ होणें, जळफळणें.
**सटरप(फ)टर**—वि. तुच्छ, सटरफटर.
**सटा**—वि. चिकटलेला, भिडलेला. –स्त्री. जटा, आयाळ. [घेऊन मारामारी करणें.
**सटाना**—क्रि. स. जोडणें, काठ्या व दंडुके
**सटिया**—स्त्री. एक दागिना, एक बांगडी, बारीक लांब छडी.
**सटीक**—वि. अगदीं बरोबर, टीकेसहित.
**सट्टा**—पु. करारनामा.
**सट्टाबट्टा**—पु. युक्ति, भेट.
**सट्टी**—स्त्री. बाजार.
**सठ**—पु. धूर्त, मूर्ख.
**सठता**—स्त्री. धूर्तता, मूर्खपणा.
**सठियाना**—क्रि. अ. साठ वर्षांचें होणें, साठी बुद्धि नाठी होणें.
**सठेरा**—पु. अंबाडीचें चिपाड.
**सठोरा-ड़ा**—पु. सुंठवडा.
**सड़क**—स्त्री. रस्ता, राजमार्ग.
**सड़ना**—क्रि. अ. सडणें, नासणें, आंबणें, दुर्दशाग्रस्त होणें.
**सड़सना**—क्रि. अ. फसणें, दबणें.
**सड़सठ**—वि. सदुसष्ठ.
**सड़सी**—क्रि. फसलेली, दबलेली, आवळ-

लेली. –स्त्री. सांडसी. [दुर्गंधी.
**सड़ाई (यँ) ध**–स्त्री. कुजलेल्या वस्तूंची
**सड़ाना**–क्रि. स. नासविणें.
**सड़ियल**–वि. कुजकें, रद्दी, तुच्छ.
**सड़ोपना**–क्रि. अ. ओरपणें.
**सत्**–वि. साधु, विद्वान्, शुद्ध, श्रेष्ठ, धीट, खरें.-पु. सभ्यतापूर्ण धर्म, ब्रह्म, सत्य, तत्त्व, सत्त्व, जीवनशक्ति.
**सतपर चढ़ना**–सती जाणें.
**सतपर रहना**–पतिव्रता रहाणें.
**सतकारना**–क्रि. स. सत्कार करणें.
**सततं**–अ. नेहमीं.
**सतनजा**–पु. सात धान्यांची खिचडी.
**सतपंच**–वि. सात पांच, बारा, भ्रम, खरे पंच, पांचशें, १०५.
**सतपुतिया**–स्त्री. एक प्रकारचें दोडकें.
**सतफेरा**–पु. सप्तपदी.
**सतबेझड़ी**–स्त्री. अठरा धान्याचें कडबोळें.
**सतमासा,सतवाँसा**–पु. सातोळा (मुलगा).
**सतरंगी**–वि. सातरंग असलेलें.
**सतरंज**–स्त्री. बुद्धिबळें.
**सतरंजी**–स्त्री. सतरंजी.
**सतर**–स्त्री. रेषा, ओळ, आडोसा, पडदा. –वि. वक्र, रागावलेला.
**सतर बतर होना**–दाणादाण होणें.
**सतरह**–वि. सत्रा.
**सतराना**–क्रि. अ. चिडणें, रागावणें.
**सतरूपा**–स्त्री. मनूच्या पत्नीचें नांव.
**सतरौंहा**–वि. रागावलेला, कोपसूचक.
**सतर्क**–वि. तर्कयुक्त, सावध.
**सतर्पना**–क्रि. स. संतुष्ट करणें.
**सतलड़ी-री**–स्त्री. सात लडयांची माळ.
**सतवंती**–स्त्री. पतिव्रता.

**सतसई**–स्त्री. सातशें पदांचा संग्रह.
**सतह**–स्त्री. सपाटी.
**सतहत्तर**–वि. सत्याहत्तर.
**सताइश**–स्त्री. प्रसंशा, वाखाणणी.
**सताग्र**–पु. रथ, गाडी.
**सतानंद**–पु. गौतम ऋषींचा पुत्र.
**सताना**–क्रि. स. त्रास देणें, हैराण करणें.
**सतालू**–पु. सप्ताळू.
**सतावना**–क्रि. स. सतावणें, त्रास देणें,
**सतावर**–स्त्री. शतावरी. [दुःख देणें.
**सति**–वि. सत्य, शुद्ध.–पु. यथार्थ गोष्ट, योग्य बाजू, सप्त लोकांतील सर्वांत वरचा, विष्णु, चार युगांपैकीं पहिलें
**सतिभाये**–चांगल्या भावनेनें. [(कृतयुग).
**सतिया**–स्त्री. स्वस्तिक.
**सतिवन**–पु. सप्तपर्णी (औषधि).
**सती**–वि. साध्वी.–स्त्री. दक्ष प्रजापतीची कन्या, पतिव्रता स्त्री, पतीच्या शवाबरोबर स्वतःला जाळून घेणारी स्त्री.
**सतीला**–वि. पराक्रमी.
**सतीवाड़**–पु. सतीचें स्थान.
**सतुआ**–पु. सातू.
**सतुआ संक्रांति**–स्त्री. मेष संक्रांत.
**सतून**–पु. स्तंभ, खांब.
**सतोखना**–क्रि. स. समजूत करणें, धीर देणें.
**सत्कर्म**–पु. चांगलें काम, पुण्य.
**सत्कार**–पु. सन्मान, आतिथ्य.
**सत्त**–पु. सत्त्व, तत्त्व, सत्य, पातिव्रत्य.
**सत्ताईस**–वि. सत्तावीस.
**सत्तानवे**–वि. सत्याणव.
**सत्तासी**–वि. सत्याऐंशी.
**सत्तू**–पु. सातू. [विष्णु, कृतयुग
**सत्य**–वि. खरें, अस्सल.–पु. खरी गोष्ट,

**सत्यता**—स्त्री. खरेपणा. [जनमेजय.
**सत्यसंध**—वि. सत्यवचनी.—पु. रामचन्द्र,
**सत्याग्रह**—पु. न्यायगोष्टीसाठीं शांतीपूर्वक
**सत्यानास**—पु. सत्यानाश. [हट्ट धरणें.
**सत्यानासी**—वि. सत्यानाश करणारा.-स्त्री. विलायती धोत्रा. [सदावर्त.
**सत्र**—पु. यज्ञ, एक सोमयाग, घर, धन,
**सत्रु**—पु. शत्रु.
**सत्रुसूदन**—पु. शत्रुघ्न. } राजा दशरथा
**सत्रूघ(ह)न**—पु. शत्रुघ्न. } चा सर्वांत लहान मुलगा.
**सत्व**—पु. सत्ता, तत्व, मनाची प्रवृति,
**सत्संग**—पु. चांगली संगत. [प्राण, चैतन्य.
**सथर**—स्त्री. स्थल, पृथ्वी.
**सथशव**—पु. रणभूमींतील प्रेत.
**सथिया**—पु. स्वस्तिक चिन्ह, शस्त्रवैद्य.
**सद**—वि. शंभर, ताजें.—अ. तत्काळ.—स्त्री.
**सदका**—पु. दान, उतारा. [स्वभाव, पडदा.
**सदन**—पु. घर, स्थिरता, एक प्रसिद्ध भगवद्‌भक्त कसाई.
**सदफ़**—स्त्री. मोत्यांचा शिंपला.
**सदम सद्म**—पु. घर.
**सदमा**—पु. आघात, दु:ख.
**सदय**—वि. दयाळु.
**सदर**—वि. मुख्य.-पु. केंद्रस्थळ, अध्यक्ष.
**सदरआला**—पु. उपन्यायाधीश.
**सदरनशीन**—पु. अध्यक्ष.
**सदरी**—स्त्री. कोपरी.
**सदस्य**—पु. सभासद, यज्ञ करणारा.
**सदहा**—वि. शेकडों, अनेक.
**सदा**—स्त्री. प्रतिध्वनि, आवाज, हांक.—
**सदाई**—अ. नेहमीं. [अ. नेहमीं, सारखें.
**सदाक़त**—स्त्री. सत्यता, साक्ष.
**सदाचार**—पु. चांगलें आचरण, माणुसकी.
**सदाबरत**—पु. सदावर्त.
**सदाबहार**—वि. सदा फुललेलें, नेहमीं हिरवें असणारें (झाड), सदाफुली.
**सदारत**—स्त्री. सभापतित्व.
**सदासुहागिन**—स्त्री. वेश्या (व्यंग).
**सदिया**—स्त्री. लाल पक्ष्याची मादी.[शेंकडा.
**सदी**—स्त्री. शतक, शंभर वर्षांचा काल,
**सदूर**—पु. वाघ, सिंह, चित्ता, एक राक्षस, एक पक्षी.—वि. सर्वोत्तम.
**सदैव**—अ. नेहमीं.
**सद्द**—पु. ध्वनि.—अ. तत्काळ.
**सद्‌भाव**—पु. मैत्री, चांगली इच्छा.
**सद्य**—अ. आजच, ह्याचवेळीं, ताबडतोब.
**सद्र, सदर**—पु. मुख्य, अध्यक्ष.
**सदृश**—वि. समान, बरोबर.
**सधना**—क्रि. अ. पूर्ण होणें, वेळ निभावून नेणें, अभ्यस्त होणें, बरोबर नेम धरणें.
**सधवा**—स्त्री' सौभाग्यवती.
**सधाना**—क्रि. स. साधणें, अभ्यासणें.
**सधीबधी (बात)**—सिद्धसाधकपणाची.
**सन**—पु. वर्ष, संवत.
**सन**—पु. अंबाडी, ताग.—स्त्री. वेगानें निघण्याचा शब्द.—वि. स्तब्ध, मौन.
**सनअत**—स्त्री. कारागिरी.
**सनक**—स्त्री. नाद, चीड, विक्षिप्तपणा.
**सनक सवार होना**—नाद लागणें.
**सनकना**—क्रि. अ. वेडें होणें, चिडणें.
**सनकादि**—चार बालस्वरूप ऋषी. (सनक सनंदन, सनतकुमार, सनातन).
**सनकाना**—क्रि. स. उत्तेजित करणें.
**सनकारना, सनकियाना**—क्रि. स. खूण करणें,
**सनद**—स्त्री. पुरावा, दाखला. [लहर येणें.

**सनदयाफ़्ता**–वि. सनद मिळालेला.
**सनना**–क्रि. अ. मिश्र होणें, विलीन होणें, [भिजणें.
**सनबंध, संबंध**–पु. संयोग, नातें.
**सनम**–पु. मूर्ति, आवडता पुरुष, प्रिया.
**सनमान**–पु. सन्मान.
**सनमानना**–क्रि. स. सन्मान करणें.
**सनमुख**–अ. समोर, समक्ष. [करणें.
**सनसनाना**–क्रि. अ. सणसण असा आवाज
**सनसनाहट**–पु. सणसण असा आवाज.
**सनसनी**–स्त्री. झिणझिण्या, भय किंवा आश्चर्यानें उत्पन्न झालेली स्तब्धता, उद्वेग.
**सनसनीदार**–वि. खळबळ उडविणारें.
**सनैहकी**–स्त्री. मातीचें भांडें.
**सना**–स्त्री. स्तुति.-क्रि. भिजलेला.
**सनाअत**–स्त्री. कारागिरी.
**सनाका**–अ. स्तंभित.–पु. सोसाटा.
**सनाका खाना**–धसका बसणें, सुन्न होणें.
**सनाका भरना**–सूं सूं वारा वाहणें.
**सनातन**–पु. प्राचीनकाळ, प्राचीन परंपरा, ब्रह्मा, विष्णु.–वि. अत्यंत प्राचीन, परंपरागत, शाश्वत.
**सनाथ**–वि. रक्षणकर्ता असलेला.
**सनाय**–स्त्री. सोनामुखी.
**सनाला**–वि. नळीसह.
**सनाह**–पु. कवच.–वि. स्वामीसह.
**सनि**–पु. शनि.
**सनिया**–पु. गोणपाट.
**सनीचर**–पु. शनिवार.
**सनीचरा**–वि. फुटक्या नशीबाचा.
**सनीचरी**–पु. शनीची पिडा, साडेसाती.
**सनेह**–पु. प्रेम, स्नेह.
**सनेहिया**–पु. स्नेही.
**सनेही**–वि. प्रेमी, स्नेह ठेवणारा.
**सनोबर**–पु. चीड नांवाचें झाड.
**सन्न**–वि. स्तब्ध, भीतीनें गप्प.
**सन्नाटा**–पु. शून्यता, एकांत, स्तब्धता, हवेचा सणसणाट, शांतता, उदासी. –वि. स्तब्ध, निर्जन.
**सन्नाटा छा जाना**–शोकाची छाया पसरणें.
**सन्नाटेमें**–एकांतीं, वेगानें.
**सन्नाटेमें आना**–स्तब्ध होणें. [होणें.
**सन्नाटा खींचना या मारना**–एकदम गप्प
**सन्निपात**–पु. सन्निपात ज्वर, एकत्र होणें, एकदम एकत्र पडणें, संयोग.
**सन्निविष्ट**–वि. जमलेलें, ठेवलेलें, स्थापित, जवळचा. [तयार.
**सन्निहित**–वि. जवळचें, जवळ ठेवलेलें,
**सपक्ष-च्छ**–पु. सहाय्यक, पंखवाला.–वि. [पोषक.
**सपत, सप्त**–वि. सात.
**सपथ**–स्त्री. शपथ.
**सपदि**–अ. लवकर.
**सपन, सपना**–पु. स्वप्न.
**सपरदाई**–पु. साजिंदे. [स्नान करणें.
**सपरना**–क्रि. अ. पूर्ण होणें, काम होणें,
**सपराना**–क्रि. स. स्नान करविणें,पूर्ण करणें.
**सपरिकर**–वि. अनुचरांसहित, थाटामाटांत.
**सपर्व**–वि. गांठ असलेला.
**सपाट**–वि. सपाट, गुळगुळीत.
**सपाटा**–पु. वेग, तीव्रगति.
**सपाटा भरना-लगाना**–सपाट्यानें पळणें.
**सपुर्द**–स्त्री. अनामत.–वि. सोंपविलेलें.
**सपुर्दगी**–स्त्री. सोपविण्याची क्रिया.
**सपूत**–पु. सुपुत्र.
**सपूती**–स्त्री. योग्यता, सत्पुत्राची आई.
**सपेव, सफ़ेद**–वि. पांढरें.

**सपेरा**–पु. गारुडी.
**सपोला**–पु. सापाचें पिल्लू.
**सफ़**–स्त्री. पंक्ति,हार,मोठी चटई,बिछायत.
**सफ़र**–पु. प्रवास, अरबांचा दुसरा महिना.
**सफ़रनामा**–पु. प्रवास वर्णन.
**सफ़रमैना**–स्त्री. आघाडीचें सैन्य.
**सफ़रा**–पु. पित्त.
**सफ़री**–वि. प्रवासी.–पु. प्रवासाचा खर्च.
**सफल**–वि. फळ लागलेलें (झाड),यशस्वी.
**सफलता**–स्त्री. यशस्विता, पूर्णता, यश.
**सफ़्हा**–पु. पान, विस्तार. [पान.
**सफ़ा**–वि. स्वच्छ,पवित्र,सपाट, गुळगुळीत,
**सफ़ाई**–स्त्री. स्वच्छता, स्पष्टता, सरलता निर्दोषता, निर्णय.
**सफ़ाई देना**–बाजू मांडणें.
**सफ़ाचट**–वि. गुळगुळीत, स्वच्छ.
**सफ़ाया**–पु. पूर्ण सत्यानाश, कांहींच शिल्लक न राहणें. [फकीर.
**सफ़ी**–वि. स्वच्छ, पवित्र, एक पारशी
**सफ़ीना**–पु. कोर्टाचें समन्स, नोंदवही, होडी.
**सफ़ीर**–पु. राजदूत.–स्त्री. पक्ष्यांचा कलरव, पक्ष्यांना बोलविण्याकरितां वाजविलेली
**सफ़ूफ़**–पु. भुकटी, चूर्ण. [शिटी.
**सफ़ेद**–वि. पांढरें. [सभ्य मनुष्य.
**सफ़ेद पोश**–पु. पांढरे कपडे वापरणारा,
**सफ़ेदा**–पु. जस्ताचें चूर्ण, आंब्याचा एक प्रकार, खरबुजाचा एक प्रकार.
**सफ़ेदी**–स्त्री. पांढरेपणा, घराला चुना लाव-
**सफेदी आना**–म्हातारपण येणें.[ण्याची क्रिया.
**सब**–वि. सर्व, पूर्ण.
**सबक़**–पु. धडा, शिकवण.
**सबक पढ़ाना**–धडा शिकविणें. [ पुढें जाणें.
**सबक़त** स्त्री. एकाद्या कामामध्यें दुसऱ्याच्या

**सबका सब**–वि. सर्व, पूर्ण.
**सबकुछ**–वि. सर्व कांहीं.
**सबज़**–वि. कच्चा, हिरवें, शुभ.
**सबज़ा**–पु. सबज़ा, भांग, पाच (रत्न), काळसर पांढऱ्या रंगाचा घोडा.
**सबज़ी**–स्त्री. भाजी, पालेभाजी, भांग.
**सबद**–पु. शब्द.
**सबनाना**–क्रि. स. साबू लावणें.
**सबब**–पु. कारण, हेतु, साधन.
**सबर**–पु. संतोष.
**सबरा**–वि. संपूर्ण.
**सबरी**–स्त्री. पहार, शबरी.–वि. सर्व.
**सबलई**–स्त्री. बळ, पराक्रम.
**सबहि**–स. सर्वच.
**सबा**–स्त्री. पूर्वेकडील वारा, सात.
**सबात**–पु. स्थिरता, दृढता.
**सबाद, स्वाद**–पु. रुचि.
**सबार**–अ. शीघ्र, सकाळ,
**सबील**–स्त्री. रस्ता, उपाय, पाणपोई.
**सबू**–पु. मातीची घागर.
**सबूत**–पु. प्रमाण.–वि. शाबूत, पूर्ण.
**सबूर**–पु. संतोष, धैर्य, सहनशीलता.
**सबूस**–स्त्री. कोंडा.
**सबेर-रा**–पु. सकाळ.
**सबै**–अ. सर्वच, सगळें.
**सबोतर**–अ. सर्वत्र.
**सब्ज़**–वि. हिरवें, ताजें.
**सब्ज़बाग दिखलाना**–लोभ दाखविणें.
**सब्ज़ कदम**–पु. पांढऱ्या पायाचा,अपशकुनी.
**सब्ज़ पोश**–वि. हिरव्या रंगाचे कपडे
**सब्ज़ा**–पु. पाहा 'सबज़ा.' [वापरणारा.
**सब्ज़ी**–स्त्री. वनस्पति, भाजीपाला, भांग.
**सब्द**–पु. शब्द.

**सब्बर**–पु. पहार.
**सब्बल**–पु. कोश.
**सब्र**–पु. संतोष, धैर्य, सहनशीलता, धीर.
**(किसीका) सब्र पड़ना**–केलेल्या कष्टाचें फळ मिळणें.
**सब्रका फल मीठा**–धीराचा शेवट गोड.
**सभर्तृका**–स्त्री. सौभाग्यवती.
**सभय**–वि. भयभीत.
**सभा**–स्त्री. सभा, समाज.
**सभापति**–पु. अध्यक्ष.
**सभी**–वि. सगळेंच.
**सभीत**–वि. भ्यालेला, भयानें.
**सभ्य**–वि. सुधारलेला, सभासद.
**सभ्यता**–स्त्री. शिष्टाचार, संस्कृति, सभ्य-[पणा.
**समंजस**–वि. उचित, न्यायी.
**समंत**–पु. सीमा, मर्यादा.–वि. पूर्ण.
**समंद**–पु. घोडा.
**समंदर, समुद्र**–पु. समुद्र.
**सम**–पु. विष.–वि. संगीतांतील सम, समान, सर्व, सपाट, सम (संख्या)..
**समअ**–पु. कान.
**समअखराशी**–स्त्री. व्यर्थ गोष्टी बोलून [डोकें उठविणें.
**समझ**–स्त्री. समज, बुद्धि.
**सजझदार**–वि. समजूतदार, बुद्धिमान.
**समझना**–क्रि. अ. समजून घेणें, समजणें.
**समझाना**–क्रि. स. समजाविणें.
**समझावा**–पु. शिकवण, उपदेश.
**समझौता**–पु. समजूत, करार, सलोखा.
**समतल**–वि. सपाट.
**समता**–स्त्री. बरोबरी.
**समतूल**–वि. समतोल, समान.
**समथल**–वि. सपाट.
**समदन**–स्त्री. भेट, उपहार.
**समदना**–क्रि. अ. प्रेमानें भेटणें.
**समदरसी**–पु. सर्वांना सारख्या दृष्टीनें [पाहाणारा.
**समधिन**–स्त्री. विहीण.
**समधियान-ना**–पु. व्याह्याचें घर.
**समधी**–पु. व्याही.
**समधौरा**–पु. सीमांत पूजन.
**समन**–पु. शमन, सरकारी आमंत्रण, समन्स.
**समन्न**–पु. फडया निवडुंग.
**समय**–पु. वेळ, संधि.
**समर**–पु. परिणाम, लाभ, धन, संतान, [लढाई.
**समरथ-त्थ**–वि. बलवान.
**समर्थन**–पु. विवेचन, एकाद्याच्या मताला [पाठिंबा देणें.
**समर्पक**–वि. समर्पण करणारा.
**समर्पण**–पु. दान देणें, आदरानें अर्पण करणें.
**समर रस**–पु. वीररस, लढाईचें सुख.
**समवाय**–पु. समधर्मी, समूह.
**समवेदना**–स्त्री. सहानुभूति.
**समसर**–स्त्री. बरोबरी.
**समस्त**–सर्व. सगळे.
**समसाम**–स्त्री. बरोबरी.
**समस्या**–स्त्री. कठिण विषय, प्रश्न.
**समस्यापूर्ति**–दिलेल्या पदाच्या एका चरणावरून इतर तीन चरण सांगण्याचा प्रश्न सोडविणें.
**समाँ**–पु. समय.
**समा**–पु. तांदुल विशेष, आकाश, वर्ष, [संवत्सर.
**समा बाँधना**–उत्तम प्रकारें गाणें, रंग [आणणें.
**समाअत**–स्त्री. सुनावणी.
**समाई**–स्त्री. समावेश.–वि. ऐकीव.
**समागत**–वि. आलेला.
**समागम**–पु. आगमन, भेट, मैथुन.
**समाचार**–पु. बातमी.
**समाचार पत्र**–पु. वर्तमानपत्र.
**समाज**–पु. समुदाय, संस्था, सभा.

**समाजी**–पु. गाणारणींचा साथीदार, आर्य-समाजी सभासद. [नाहींसा करणें.
**समाधान**–पु. समाधि, निराकरण, विरोध
**समाधि**–स्त्री. समर्थन, अंगीकार, ध्यान, प्रतिज्ञा, झोंप, प्रेत गाडलेली जागा, समाधान, एक अर्थालंकार.
**समान**–वि. बरोबर, तुल्य.
**समानता**–स्त्री. बरोबरी.
**समाना**–क्रि. अ. सामावणें, आंत शिरणें.
**समारोह**–पु. समारंभ, उत्सव.
**समाली**–स्त्री. पुष्प गुच्छ.
**समालू**–पु. निर्गुंडीचें झाड.
**समालोचक**–पु. टीकाकर.
**समालोचन**–पु. परीक्षण, गुणदोष विवेचन.
**समालोचना**–स्त्री. परीक्षण.
**समावी**–वि. आकाशाचें, दैवी.
**समावेश**–पु. एकाजागीं राहणें, एक पदार्थ दुसऱ्या पदार्थांत असणें.
**समाशोधन**–पु. क्लिअरिंग (हाऊस).
**समाष**–वि. क्रोधयुक्त, रागावलेला.
**समास**–पु. संक्षेप, समर्थन, संग्रह, व्याकरणांतील समास.
**समिति**–स्त्री. समाज, सभा, एकाद्या विशिष्ट कार्याकरितां नेमलेली कमिटी.
**समिध**–पु. अग्नि.
**समीक्षा**–स्त्री. परीक्षण, प्रयत्न, टीका,
**समीचीन**–वि. यथार्थ, उचित. [बुद्धि.
**समीप**–वि. जवळ.
**समीर**–पु. वारा, प्राणवायु.
**समीहा**–स्त्री. इच्छा, पूर्ण इच्छा.
**समुचित**–वि. योग्य, हवा तसा.
**समुझ**–स्त्री. पाहा 'समझ'.
**समुझना**–क्रि. स. समजणें, विचार करणें.
**समुझनी**–स्त्री. विचार, समज.
**समुझावना**–क्रि. स. समजाविणें, जाणणें.
**समुद्र**–पु. समुद्र, एकाद्या विषयाचा किंवा गुणाचा आगर.
**समुदाई**–पु. झुंड, समुदाय, ढीग.
**समुदाय**–पु. समाज, जमाव.
**समुन्नति**–स्त्री. उन्नति, मोठेपणा, उच्चता.
**समुल्लास**–पु. आनंद, ग्रंथाचें प्रकरण.
**समुहा**–वि. समोरचें.–अ. समोर.
**समुहाना**–क्रि. अ. समोर येणें.
**समुहें**–अ. पुढें.
**समूच-चा**–वि. संपूर्ण, सर्वच्या सर्व.
**समूम**–स्त्री. उष्ण हवेची तिरीप.
**समूर**–पु. कोल्ह्याच्या जातीचा एक प्राणी.
**समूल**–वि. मुळापासूनचा, कारणासहित.
**समूह**–पु. रास, समुदाय. [–अ. मुळापासून.
**समेट**–पु. सलोखा, एकीकरण.
**समेटना**–क्रि. स. गोळा करणें, आपल्यावर
**समेत**–वि. संयुक्त.–अ. सहित. [ओढून घेणें.
**समोना**–क्रि. स. मिसळणें.
**समौ**–पु. समय.
**समौरिया**–वि. समवयस्क.
**सम्पत्ति**–स्त्री. धन, संपत्ति.
**सम्प्रदाय**–पु. गुरुमंत्र, एकाद्या विशेष धर्मासंबंधीचें मत, एकाद्या मताच्या अनुयायांची मंडळी, रीत.
**सम्पूर्ण**–वि. सगळे, खूप भरलेले, समाप्त.–पु. साती स्वर लागणारा राग.
**सम्बन्ध**–पु. एकत्र बांधणें, संबंध, नातें, संयोग, विवाह, व्याकरणांतील कारक, संबंध.

**सम्बोधन**–पु. जागविणें, हांक मारणें, समजाविणें, संबोधन कारक, बजावून सांगणें.
**सम्मान**–पु. सन्मान.
**सम्मीलित**–वि. मिश्रित.
**सम्मुख**–अ. समोर.
**सम्मेलन**–पु. सभा, जमाव, संगम.
**सय**–वि. शंभर.–पु. छाया, चीज.
**सयन**–पु. शयन, शय्या.
**सयराना**–क्रि. स. वाढणें, पसरणें, लांबणें.
**सयानपत**–स्त्री. शहाणपण.
**सयानपन-ना-**पु. शहाणपण.
**सयाना**–वि. शहाणा, चतुर, चलाख, वयांत आलेला. [पटु, पंचाक्षरी.
**सयानी**–वि. वयांत आलेली, वयोवृद्ध,
**सर**–पु. डोकें, तलाव, बाण, सरदार, नेता, शक्ति, आरंभ.–स्त्री. चिता.–वि. जिंकलेला, दमन केलेला.
**सरअंजाम**–पु. सरंजाम, सामग्री.
**सरकंडा**–पु. एक वनस्पति, सनकाडी.
**सरक**–स्त्री. सरकणें, दारूची नशा.
**सरकना**–क्रि. अ. सरकणें, टाकणें, काम
**सरकश**–वि. उद्धट, विरोधी. [चालणें.
**सरका**–पु. चोरी. [संस्था.
**सरकार**–स्त्री. शासनकर्ता, मालक, राज्य-
**सरकारी कागज़**–पु. सरकारी कागद, नोट.
**सरकोबी**–स्त्री. दमन, शिक्षा.
**सरख़त**–पु. भाडेचिट्ठी, सान्याची पावती, आज्ञापत्र, कर्जखत.
**सरग**–स्त्री. स्वर्ग, अध्याय.
**सरगना**–पु. नेता.
**सरगम**–पु. संगीताचे सप्त स्वर.
**सरगरवाँ**–वि. हैराण, ओवाळलेला.
**सरगरम, सरगर्म**–वि. उत्साही, चलाख, तेजस्वी आवेशपूर्ण.
**सरगश्ता**–वि. दुर्दशा झालेला, विकल.
**सरगुज़श्त**–स्त्री. येऊन ठेपलेला प्रसंग,
**सरगुन**–वि. सगुण. [वर्णन, जीवनचरित्र.
**सरगोशी**–स्त्री. चुगली, निंदा.
**सरघा**–स्त्री. मधमाशी.
**सरचश्मा**–पु. नदीचा उगम, झरा.
**सरज़द**–वि. प्रगट, जाहीर.
**सरजना**–क्रि. स. रचणें, बनविणें, उत्पन्न करणें, सृष्टि करणें.
**सरज़मीन**–स्त्री. देश, जमीन.
**सरजा**–पु. सिंह, श्रेष्ठ व्यक्ति.
**सरजीव**–वि. सजीव. [ल्लित.
**सरजीवन**–वि. सुपीक, जगविणारा, प्रफु-
**सरजू-यू**–स्त्री. शरयू. [दृष्ट.
**सरज़ोर**–वि. शिरजोर, बलवान, विरोधी,
**सरज़ोरी**–स्त्री. शिरजोरपणा.
**सरताज**–पु. सर्वश्रेष्ठ. [फोड.
**सरतान**–पु. खेकडा, कर्करास, एक प्रकारचा
**सरद**–वि. थंड.–स्त्री. शरद ऋतु.
**सरदई**–वि. हिरवा व पिवळा रंग असलेले.
**सरदर**–अ. एका टोकानें, एकदम मिळून.
**सरदर्द**–पु. मस्तकशूळ.
**सरदा**–पु. खरबूज.
**सरदार**–पु. मुख्य व्यक्ति, अमीर.
**सरदार सभा**–स्त्री. हाऊस ऑफ लॉर्डस्.
**सरधन**–वि. श्रीमंत.
**सरधर**–पु. बाणांचा भाता.
**सरधा**–स्त्री. श्रद्धा.
**सरन**–स्त्री. शरण, रक्षण.
**सरनदी (द्वी) प**–पु. सिलोन.
**सरनविश्त**–स्त्री. नशीब.

**सरना**–क्रि. अ. सरकणें, हलणें, काम
**सरनागत**–वि. शरणागत. [चालणें, करणें.
**सरनाम**–वि. प्रसिद्ध.
**सरनामा**–पु. शीर्षक, पत्रावरील पत्ता.
**सरनी**–स्त्री. रस्ता, सरणी.
**सरप, सर्प**–पु. सर्प.
**सरपट**–अ. भरधांव. [प्रकारचें गवत.
**सरपत**–पु. छप्परावर घालण्याचें एक
**सरपरस्त**–पु. संरक्षक.
**सरपा**–पु. साप. [वाढून.
**सरपि, सर्पिस**–पु. तूप.–अ. चालून, सरून,
**सरपोश**–पु. झांकण.
**सरफ़राज़**–वि. प्रतिष्ठित, वेश्या.
**सरफराना**–क्रि. अ. घाबरणें.
**सरफ़रोश**–वि. स्वतःचें बलिदान करणारा.
**सरफ़रोशी**–स्त्री. स्वतःचें बलिदान.
**सरफ़ा**–पु. खर्च, मितव्यय, वृद्धि.
**सरफें(फो)का**–पु. उन्हाळीचें झाड.
**सरबंध-धी**–पु. धनुर्धर.
**सरब**–वि. सर्व.
**सरबदा**–अ. सर्वदा, नेहमीं.
**सरब बियापी**–वि. सर्वव्यापी.
**सरबर**–पु. तलाव, बरोबरी. [मुख्य.
**सरबराहकार**–पु. व्यवस्थापक, मजुरांचा
**सरबराही**–स्त्री. व्यवस्था.
**सरबरी**–अ. सर्वत्र.–स्त्री. समता, बरोबरी,
**सरबस**–पु. सर्वस्व. [उलट उत्तर.
**सरबस्ता**–वि. लपलेलें, गुप्त.
**सरबाज**–वि. वीर.
**सरबुलंद**–वि. प्रतिष्ठित, नशीबवान.
**सरभंग**–पु. एक प्राचीन महर्षि (वनवासांत असतांना रामचंद्र यांच्या दर्शनाला
**सरभ**–पु. पतंग(दिव्याचा). [गेले होते).
**सरम**–स्त्री. लाज.
**सरमस्त**–वि. मस्त, उन्मत्त. [शीतकाळ.
**सरमा**–स्त्री. देवांची एक प्रसिद्ध कुत्री,
**सरमाई**–स्त्री. हिंवाळ्यांत वापरावयाचे कपडे.–वि. हिंवाळ्यासंबंधीं.
**सरमाया**–पु. संपत्ति, कारण, भांडवल.
**सरमाया(ए)दार**–पु. जमीनदार, इनामदार, भांडवलदार. [धांव जाणें.
**सरराना**–क्रि. अ. सोसाट्यानें वाहणें, भर-
**सरल**–वि. सोपें, सहज, निष्कपट.–पु.
**सरव**–पु. मद्यपात्र, वाटी, दिवा. [देवदार.
**सरवत**–स्त्री. वैभव.
**सरवन**–पु. कान, श्रवण, नक्षत्र, श्रावण.
**सरवर**–पु. सरोवर.
**सरवरि**–स्त्री. बरोबरी, तुलना. [स्त्री.
**सरवरी**–स्त्री. ममता, रात्र, संध्याकाळ,
**सरवरे कायनात**–पु.पृथ्वींतील मुख्य पुढारी, महमंद पैगंबराची एक पदवी.
**सरवा**–पु. झारी, सुरई.
**सरवाक**–पु. पेला, वाटी, दिवा.
**सरवान**–पु. डेरा, तंबू. [भरलेला.
**सरशार**–वि. नशेंत चूर, मदमस्त, पूर्ण
**सरस**–वि. रसयुक्त, ओला, ताजा, सुंदर, गोड, भावपूर्ण, उत्तम, रसिक.
**सरसई**–स्त्री. सरस्वती, शरयू नदी, रसिकता, ताजेपणा, फळांचा अंकुर.
**सरसठ**–वि. सदुसष्ठ.
**सरसना**–क्रि. अ. टवटवीत होणें, शोभणें, रसभरित होणें, भावनेची ऊर्मि उठणें.
**सरसब्ज़**–वि. हिरवळ.
**सरसराना**–क्रि. अ. हवा खेळणें, सरपटणें.
**सरसराहट**–स्त्री. सळसळ, खाज, वारा वाहण्याचा आवाज.

**सुजनता**–स्त्री. सौजन्य.
**सुजनी**–स्त्री. बिछान्याची मोठी चादर.
**सुजस**–पु. सुयश.
**सुजागर**–वि. प्रकाशमान सुशोभित.
**सुजान**–वि. सुजाण, निपुण, पंडित, सज्जन. –पु. पति किंवा प्रेमी, ईश्वर.
**सुजानी**–वि. पंडित, ज्ञानी.
**सुजोग**–पु. सुयोग, चांगली संधि.
**सुजोर**–वि. दृढ.
**सुझाना**–क्रि. स. सुचविणें, दाखविणें.
**सुझाव**–पु. सूचना.
**सुटुकना**–क्रि. अ. सुडसुड शब्द करणें, आकुंचन पावणें.–क्रि. स. चाबूक ओढणें.
**सुटुकि**–अ. चाबूक मारून.
**सुठ**–वि. सुंदर, अत्यंत.–अ. पूर्ण.
**सुठ(ठा)हर**–पु. उत्तम स्थान.
**सुठार**–वि. सुंदर, डौलदार.
**सुठि**–वि. सुन्दर' पुष्कळ.–अ. पूर्णपणें.
**सुठौर**–पु. उत्तम स्थान.
**सुड़कना, सुड़सुड़ाना**–क्रि. स. सुडसुड शब्द उत्पन्न करणें, भुरकणें.
**सुडौल**–वि. सुन्दर, डौलदार.
**सुढंग**–पु. चांगली रीत.
**सुढ़र**–वि. प्रसन्न, दयाळु, डौलदार.
**सुढार-रू**–वि. डौलदार, सुंदर.
**सुतंत, सुतंतर**–वि. स्वतंत्र.
**सुतंत्र**–वि. स्वतंत्र.–अ. स्वतंत्रतापूर्वक.
**सुत**–पु. पुत्र.–वि. पार्थिव, उत्पन्न झालेला.
**सुतधार**–पु. सूत्रधार, चालक.
**सुतना**–पु. पायजमा.–क्रि. अ. निजणें.
**सुतनी**–वि. पुत्रवती.
**सुतर**–पु. उंट.
**सुतरनाल**–स्त्री. उंटावरील तोफ.
**सुतरां**–अ. याकरितां, निदान, अत्यंत, [आणखीसुद्धां.
**सुतरी-ली**–स्त्री. सुतळी.
**सुतह(हा)र**–पु. सुतार, कारागिर.
**सुतहा**–पु. सुताचा व्यापार करणारा.–वि. सुती.
**सुता**–स्त्री. कन्या. [सवलत.–वि. उत्तम.
**सुतार**–पु. सुतार, कारागिर, चांगली संधि,
**सुतार बैठना या होना**–सोय होणें.
**सुतारी**–स्त्री. चांभाराची सुई, सुताराचें काम.–पु. शिल्पकार.
**सुतिन**–स्त्री. रूपवती स्त्री.
**सुतिया**–स्त्री. स्त्रियांच्या गळयांतील एक
**सुतीख(छ)न**–वि. अत्यंत तीक्ष्ण. [दागिना.
**सुतीछी**–वि. तीक्ष्ण धारेची.
**सुतुही**–स्त्री. शिंपली.
**सुतून**–पु. स्तंभ, खांब.
**सुथना**–पु. पायजमा.
**सुथनी**–स्त्री. स्त्रियांचा सैल पायजमा, अळवाच्या कंदासारखें फळ.
**सुथरा**–वि. स्वच्छ.
**(साफ) सुथरा**–नीटनेटका.
**सुथराई**–स्त्री. स्वच्छता, निर्मलता.
**सुथरेशाही**–पु. गुरुनानकचा शिष्य सुथराशाह यानें चालविलेला संप्रदाय, या संप्रदायाचा अनुयायी.
**सुदावन**–पु. सुदाम, समुद्र, ऐरावत.
**सुदि-दी**–स्त्री. शुक्लपक्ष.
**सुदीपति**–स्त्री. प्रकाश, खूप उजेड.
**सुदूर**–वि. फार दूर. [स्वदेश.
**सुदेस**–पु. उत्तम देश, उपयुक्त स्थान,
**सुद्दा-द्दी**–पु. पोटांतील सुकलेला मळ.
**सुध**–स्त्री. शुद्ध, स्मरण, चेतना, बातमी.
**सुध दिलाना**–आठवण देणें.

**सुध न रहना**–आठवण न राहणें.
**सुध विसरना या बिसारना**–विसरून जाणें, [एकाद्याला विसरणें.
**सुधबुध**–शुद्ध, चैतन्य.
**सुधमना**–वि. सचेत.
**सुधर**–पु. बया नांवाचा एक पक्षी.
**सुधरना**–क्रि. अ. सुधारणें, संशोधन होणें.
**सुधराई**–स्त्री. सुधारण्याचें काम किंवा मजुरी, सुधारणा.
**सुधवाना**–क्रि. स. दोष दूर करणें.
**सुधा**–स्त्री. अमृत गंगा, दूध, जल, पृथ्वी, वीट, वीज, मध, चुना, अर्क, रस, [विष.
**सुधाई**–स्त्री. सरळपणा, साधेपणा.
**सुधाकर**–पु. चंद्र. [कुंडली करविणें.
**सुधाना**–क्रि. स. आठवण करणें, शोधविणें,
**सुधार**–पु. सुधारणा. [सुधारक.
**सुधारक**–पु. संशोधक,सामाजिक व धार्मिक
**सुधारना**–क्रि. स. सुधारणें.
**सुधारा**–वि. निष्कपट.
**सुधि**–स्त्री. पाहा 'सुध'.
**सुधियाना**–क्रि. स. पाहा 'सुधाना'.
**सुधी**–पु. विद्वान.–वि. चतुर, धार्मिक, बुद्धिमान.–स्त्री. चांगली बुद्धि.
**सुन**–वि. सुन्न.
**सुन किरवा**–पु. सोन किडा.
**सुनगुन**–स्त्री. भेद, माग, कानगोष्टी.
**सुनत-ति**–स्त्री. सुंता.
**सुनना**–क्रि. स. ऐकणें. [शरीर बहिरावणें.
**सुनबहरी**–स्त्री. पाय सुजण्याचा रोग,
**सुन बहिरी**–स्त्री. ऐकलें न ऐकलेंसें करणें.
**सुनयना**–वि. सुंदर डोळ्यांची.
**सुनरा, सुनवार**–पु. सोनार.
**सुनवय्या**–वि. ऐकणारा, ऐकविणारा.
**सुनवाई**–स्त्री. सुनावणी, ऐकण्याची क्रिया.
**सुनसर**–पु. एक प्रकारचा दागिना.
**सुनसान**–वि. सामसूम, निर्जन.
**सुनहरा-ला**–वि. सोनेरी.
**सुनहा**–पु. कुत्रा.
**सुनाई**–स्त्री. ऐकण्याची क्रिया.
**सुनाजू**–पु. चांगलें धान्य. [टाकून बोलणें.
**सुनाना**–क्रि. स. ऐकविणें, फटकारणें,
**सुनार**–पु. सोनार. [सुंदर स्त्री.
**सुनारी**–स्त्री. सोनारीण, सोनाराचें काम,
**सुनावनी**–स्त्री. बाहेरगांवाहून आलेल्या आप्ताच्या मृत्यूचा समाचार, मृत्यूच्या समाचारानंतर करावयाची अंघोळ.
**सुनासीर**–पु. इंद्र.
**सुनाहक**–अ. व्यर्थ, फुकटचें.
**सुनील**–पु. डाळिंबाचें झाड, लाल कमळ.
**सुनीलक**–पु. नीलकांति हिरा, निळा भुंगा.
**सुनी अन सुनी कर देना**–ऐकलें न ऐकलेंसें [करणें.
**सुनैय्या**–वि. ऐकणारा.
**सुन्दर**–वि. सुंदर.
**सुन्न**–वि. निर्जीव.–पु. शून्य.
**सुन्नत**–स्त्री. प्रथा, महंमदानें केलेलें काम, [सुंता.
**सुन्ना**–पु. टिंब, शून्य.
**सुन्नी**–पु. सुनी पंथ.
**सुपच**–पु. चांडाळ.
**सुपत**–वि. प्रतिष्ठित. [वृत्त.–वि.समतल.
**सुपथ**–पु. सदाचरण, चांगला रस्ता, एक
**सुपन, सुपना**–पु. स्वप्न.
**सुपरस**–पु. स्पर्श.
**सुपारी**–स्त्री. सुपारी.
**सुपास**–पु. आराम.
**सुपासी**–वि. सुख देणारा.
**सुपुर्द**–पु. सोपविलेलें.
**सुपूत**–पु. सुपुत्र.

**सुपेत-व**–वि. पांढरें, उज्वल.
**सुपेती**–स्त्री. पांढरेपणा.
**सुपेदा**–पु. कथील किंवा शिशाचें भस्म.
**सुपेदी**–स्त्री. सफेती, पांघरण्याची चादर,
**सुपेली**–स्त्री. लहान सूप.[पासोडी,बिछाना.
**सुफल**–पु. सुंदर फळ, चांगला परिणाम.
**सुफूफ**–पु.चूर्ण.[–वि.सुंदर फळांचा, सफळ.
**सुबकन**–पु. हुंदका.
**सुबकना**–क्रि. अ. हुंदका देणें.
**सुबकी**–स्त्री. हुंदका.
**सुबरन**–पु. सुवर्ण, उत्तम रंग.
**सुबस**–वि. स्वतंत्र, स्वच्छंदी.
**सुबह**–स्त्री. सकाळ.
**सुबहदम**–अ. मोठ्या पहाटेस.
**सुबहसादिक**–स्त्री. अरुणोदय.
**सुबहा**–स्त्री. लहान जपमाळ, स्मरणी.
**सुबहान, सुभान**–वि. पवित्र, स्वतंत्र.
**सुबहान अल्ला**–अ. अरबी भाषेंतील एक आश्चर्योद्‌गार, मी पवित्रता पूर्वक ईश्वराचें स्मरण करतों.
**सुबास**–स्त्री. सुवास.
**सुबाहु**–पु. धृतराष्ट्राचा मुलगा, सैन्य.–वि. दृढ आणि सुंदर बाहूंचा.
**सुबि(वि)धा**–स्त्री. अनुकूलता, सवलत.
**सुबिस्ता, सुबीता**–पु. सुयोग, सवलत.
**सुबुक**–वि. हलकें, सुंदर.–पु. एक घोडा.
**सुबुक दस्त**–वि. चपल, जलद काम करणारा.
**सुबुकी**–स्त्री. हलकेंपणा, अपमान.
**सुबूत**–पु. प्रमाण, पुरावा.
**सुबेल**–पु. लंकेत एका शिखराचें नांव.
**सुभ, शुभ**–वि. शुभ.
**सुभग**–वि. सुंदर, मनोहर, भाग्यवान, प्रिय, सुखकर, ऐश्वर्ययुक्त. [स्त्री.
**सुभगा**–स्त्री. आपल्या पतीस प्रिय असलेली
**सुभगुन**–पु. चांगला गुण, उत्तम आचरण.
**सुभट**–पु. महान योद्धा.
**सुभर**–वि. शुभ्र, पांढरें, संपूर्ण भरलेलें.
**सुभा**–स्त्री. अमृत, शोभा, हरडा, परस्त्री.
**सुभाई, सुभाऊ, सुभाय, सुभाव-वू**–पु. स्वभाव.–अ. स्वभावतः, सहज.
**सुभाग**–पु. सौभाग्य, सुदैव.
**सुभागी**–वि.–भाग्यशाली.
**सुभायक**–वि. स्वाभाविक.
**सुभिक्ष**–पु. सकाळ.
**सुभीता**–पु. सुयोग, सवलत.
**सुभीतेसे**–अ. सोईसोईनें.
**सुभुज**–वि. सुंदर बाहु असलेला.–पु. एक राक्षस.
**सुभौटी**–स्त्री. शोभा, सुंदरता.
**सुभ्र, शुभ्र**–वि. शुभ्र, पांढरें. [सारथी.
**सुमंत-त्र**–पु. दशरथ राजाचा मंत्री आणि
**सुम**–पु. खुर, टाप, चंद्र, कापूर, आकाश, पुष्प. [भक्ति, मैत्री.–वि. बुद्धिमान.
**सुमति**–स्त्री. सागराची पत्नी, सुबुद्धि,
**सुमन**–पु. देव, पंडित, विद्वान, फूल.–वि. सहृदय, सुन्दर.
**सुम(मि)रन**–पु. स्मरण.
**सुमरना**–क्रि. स. स्मरण करणें, जप करणें.
**सुमरनी**–स्त्री. जपाची लहान माळ.
**सुमित्रा**–स्त्री. दशरथाची पत्नी. [वृत्त.
**सुमुखी**–स्त्री. सुन्दर स्त्री, आरसा, एक
**सुमेरू**–पु. पुराणांतील एक सोन्याचा पर्वत, शिवाजी, जपमाळेचा मधला मणी, एक वृत्त.–वि. फार उंच, सुंदर.
**सुमृति**–स्त्री. धर्मशास्त्र, मिमांसा.
**सुरंग**–स्त्री. बोगदा, सुरुंग, पाणसुरुंग, संधि, उत्तम रंग.–वि. सुंदर रंगाचा, सुंदर, सुरस, लाल रंगाचा, निर्मळ.–पु. नारंगी.

**सुर**–पु. देव, विद्वान, आवाज, स्वर.
**सुरमें सुर मिलाना**–हांजी हांजी करणें.
**सुरकंत**–पु. इंद्र.
**सुरक**–पु. त्रिपुंड. [जाणें.
**सुरकना**–क्रि. स. हवेबरोबर वर ओढलें
**सुरकुदाँव**–पु. फसविण्याकरितां स्वर बदलून बोलणें.
**सुरक्षित**–वि. चांगल्या प्रकारें रक्षण केलेलें.
**सुरख-खा**–पु. लालरंग, मद्य, दारु.–वि. तांबडा, लाल.
**सुरखाब**–पु. चातक पक्षी. [असणें.
**सुरखाबका पर लगाना**–विलक्षणपणा
**सुरखी**–स्त्री. विटांचा चुरा, लाली, लेखाचा मथळा, रक्त.
**सुरंग**–वि. सुंदर रंगाचा, डौलदार, रसाळ, लाल रंगाचा, स्वच्छ.–पु. संत्रें. –स्त्री. डोंगरांत सुरुंग लावून तयार
**सुरग**–पु. स्वर्ग. [केलेला रस्ता.
**सुरगुरु**–पु. बृहस्पति, विष्णु.
**सुरज**–पु. सूर्य. [चतुर.
**सुरजन**–पु. देवाचा समूह. –वि. सज्जन,
**सुरझना**–क्रि. अ. उकलणें.
**सुरझाना**–क्रि. स. सोडविणें, उघडणें, मोकळें करणें.
**सुरत-ति**–स्त्री. आठवण.–पु. संभोग.
**सुरतरू**–पु. कल्पवृक्ष. [नसणें.
**सुरत बिसारना**–विस्मरण होणें, आठवण
**सुरता**–वि. शहाणा.–स्त्री. देवत्व, देवांचा समूह, ध्यान, चेतना.
**सुरतिय**–स्त्री. देवाची स्त्री
**सुरती**–स्त्री. तंबाखू.
**सुरतीला**–वि. सावध, स्मरण ठेवणारा.
**सुरतैन**–स्त्री. रखेली.
**सुरदार**–वि. सुस्वर.
**सुरधुनी**–स्त्री. गंगानदी.
**सुरनाह**–पु. इंद्र.
**सुरफा**–पु. खोकला, कास.
**सुरबहार**–पु. सतारी सारखें एक तंतुवाद्य.
**सुरबिरिछ, सुरवृच्छ**–पु. कल्पवृक्ष.
**सुरबेल**–स्त्री. कल्पलता.
**सुरभंग**–पु. स्वरभंग.
**सुरभान**–पु. इंद्र, सूर्य.
**सुरभि**–पु. वसंत ऋतु, चैत्र महिना, सोनें.–स्त्री. पृथ्वी, गाय, दारू, तुळस, सुगंध. वि. सुगंधित, सुंदर, उत्तम.
**सुरभीला**–वि. सुगंधित.
**सुरमई-यी**–वि. फिक्का निळा.–पु. फिक्का निळा रंग वा रंगाचा कपडा. [सळई.
**सुरमचू**–पु. सुरमा डोळ्यांला लावण्याची
**सुरमा**–पु. डोळ्यांत घालावयाचें एक अंजन.
**सुरमौर**–पु. विष्णु.
**सुरराई-ज-य**–पु. इंद्र, विष्णु.
**सुररुख**–पु. कल्पवृक्ष.
**सुरलि**–स्त्री. क्रीडा, खेळ.
**सुरवीथी**–स्त्री. देवमार्ग, आकाश गंगा.
**सुरस**–वि. सरस, रसदार, स्वादिष्ट, गोड, सुंदर.
**सुरसर**–पु. मानस सरोवर.–स्त्री. गंगानदी.
**सुरसरि-री, सुरसरिता**–स्त्री. गंगानदी.
**सुरसा**–स्त्री. एक अप्सरा, तुळस, ब्राह्मी, दुर्गा, एका वृक्षाचें नांव, सर्पांची आई.
**सुरसाई**–पु. इंद्र, बिष्णु, शिव.
**सुरसाल-लु**–वि. देवशत्रु.
**सुरसुराना**–क्रि. अ. चळ येणें, कड येणें.
**सुरसुरी**–स्त्री. अळी, सोंड किडा.
**सुरसेनप**–पु. देवांचा सेनापति, कार्तिकेय.

**सुरसैंयाँ**–पु. पाहा ' सुरसाई '.
**सुरहना**–क्रि. अ. भरून येणें.
**सुरहरा**– वि. सुरसुर शब्द करणारा.
**सुरही**–स्त्री. कामधेनु, जुगाराच्या सोळा [कवड्या.
**सुरांगना**–स्त्री. देवांगना.
**सुरा**–स्त्री. मद्य, दारू, पाणी, सुरई.
**सुराई**–स्त्री. शौर्य, देवत्व.
**सुराख**–पु. छिद्र, भोंक.
**सुराग़**–पु. अत्यंत प्रेम, सुगावा, शोध.
**सुराग़ रसाँ**–वि. पत्ता लावणारा.
**सुरागाय**–स्त्री. नीलगाय.
**सुराती**–स्त्री. चांगली रात्र.
**सुरानीक**–पु. देवांचें सैन्य, चांगलें मद्य.
**सुरारि-री**–पु. राक्षस.
**सुरासार**–पु. अलकोहोल.
**सुरासुर**–पु. देव आणि दानव.
**सुराही**–स्त्री. सुरई.
**सुरीन**–पु. ढुंगण, नितंब.
**सुरीला**–वि. प्रसन्न, अनुकूल.
**सुरुख**–वि. प्रसन्न, लाल.
**सुरुखरू**–वि. तेजस्वी, यशस्वी, सफल.
**सुरुचि**–स्त्री. ध्रुवाची सावत्र आई, चांगली रुचि.–वि. रुचकर.
**सुरुबा**–पु. भाजीचा रस, रस्सा.
**सुरूर**–पु. आनंद, मामुली नशा.
**सुरैत, सुरैतिन**–स्त्री. रखेली.
**सुर्ख़**–वि. लाल रंगाचा. –पु. लाल.
**सुर्ख़रू**–वि. तेजस्वी, यशस्वी, प्रतिष्ठित.
**सुर्ख़ी**–स्त्री. लाली, लेखाचा मथळा, रक्त.
**सुर्ता**–वि. हुशार, बुद्धिमान.
**सुर्रा**–पु. पैसे ठेवण्याची थैली, कसा.
**सुलक्खन, सुलच्छन**–वि. सुलक्षणी, भाग्यवान. –पु. शुभ लक्षण.
**सुलग**–अ. जवळ.
**सुलगना**–क्रि. अ. पेटणें, संताप होणें.
**सुलगाना**–क्रि. स. पेटविणें.
**सुलगै**–क्रि. चांगल्या रीतीनें पेटलें.
**सुलच्छनी**–वि. सुलक्षणी, भाग्यवान.
**सुलच्छ**–वि. सुंदर. [होणें, सोपें होणें.
**सुलझना**–क्रि. अ. उकलणें, कठिणता दूर
**सुलझाना**–क्रि. स. सोडविणें, गुंतागुंत नाहींशी करणें, प्रश्न सोडविणें.
**सुलझाव**–पु. उकल.
**सुलटा**–वि. सुलट, उलट याच्या विरुद्ध.
**सुलतान**–पु. सम्राट, बादशहा.
**सुलताना**–स्त्री. सम्राज्ञी.
**सुलताना चंपा**–पु. उंडल ( याच्या बियांचें तेल काढतात. )
**सुलतानी**–स्त्री. बादशाही, एक प्रकारचें रेशमी कापड. –वि. लाल रंगाचा.
**सुलप**–वि. स्वल्प, थोडें.
**सुलफ**–वि. कोमल, नाजूक, लवचिक, मृदु.
**सुलफ़ा**–पु. चरस, गांजा.
**सुलफ़ेबाज**–वि. गांजेकस.
**सुलभ**–वि. सहज मिळणारा, समजण्यास [सुलभ, साधारण.
**सुलह**–स्त्री. तह, भेट.
**सुलहनामा**–पु. तहनामा.
**सुलाना**–क्रि. स. निजविणें. [सालोमन.
**सुलेमान**–पु. यहुद्यांचा एक प्रसिद्ध राजा
**सुलेमानी**–पु. पांढऱ्या डोळ्यांचा घोडा, काळा व पांढरा असा दुरंगी दगड.
**सुव,सुवन**–पु. मुलगा, सूर्य, अग्नि, चंद्र, [सुमन.
**सुवटा**–पु. पोपट.
**सुवनारा**–पु. पुत्र.
**सुवस**–वि. स्वाधीन.
**सुवांग**–पु. सोंग, नक्कल.

**सुवा**–पु. पोपट, मोठी सुई.
**सुवाना**–क्रि. स. निजविणें.
**सुवार**–पु. स्वयंपाकी, चांगला दिवस.
**सुवास**–पु. चांगला वास, सुंदर घर, एक वर्णवृत्त.
**सुवासिनी**–स्त्री. सधवा स्त्री, तारुण्यांत सुद्धां पित्याच्या घरीं राहणारी स्त्री.
**सुविधा**–स्त्री. पाहा 'सुभीता'.
**सुशील**–वि. शीलवान, सच्चरित्र, नम्र.
**सुष (स) मा**–स्त्री. शोभा, सौंदर्य, दहा अक्षरांचें एक वृत्त. [अ. सुकणें.
**सुषाना**–क्रि. स. सुकविणें, वाळविणें.–क्रि.
**सुषुप्ति, सुषोपति**–स्त्री. निद्रा, अज्ञान.
**सुष्ठ**–अ. चांगल्या रीतीनें. –वि. उत्तम,
**सुष्ठता**–स्त्री. सौंदर्य, सौभाग्य. [सुंदर.
**सुस**–स्त्री. बहीण.
**सुसकना**–क्रि. अ. स्फुंदणें, हुंदके देणें, जिवाची धागधुग होणें, भीति वाटणें, उचकी लागणें, उर्ध्व श्वास लागणें, अधीर होणें.
**सुसताना**–क्रि. अ. आराम करणें.
**सुसती**–स्त्री. आळस, ढिलाई.
**सुसर-रा**–पु. सासरा.
**सुसराल**–स्त्री. सासुरवाडी.
**सुसरी**–स्त्री. सासू, गंगानदी.
**सुसा**–स्त्री. बहीण.
**सुसाना**–पाहा 'सिसकना'.
**सुसीतलाई**–स्त्री. थंडगारपणा.
**सुसेन**–पु. पाहा 'सुषेण'.
**सुस्त**–वि. दुर्बल, कमजोर, आळशी, उदास निस्तेज, निरुत्साही.
**सुस्ताई, सुस्ती**–स्त्री. आळस, शैथिल्य.
**सुस्ताना**–क्रि. अ. आराम करणें.
**सुस्थ**–वि. निरोगी, स्वस्थ, सुखी, आनंदी,
**सुस्थचित्त**–वि. प्रसन्नचित्त. [सुस्थिर.
**सुस्थता**–स्त्री. निरोगीपणा, स्वास्थ्य, शांति, प्रसन्नता, कुशल, क्षेम.
**सुस्वादु**–वि. स्वादिष्ट.
**सुहंग**–वि. स्वस्त.
**सुहटा**–वि. सुंदर.
**सुहड़**–पु. योद्धा.
**सुहनी**–स्त्री. केरसुणी, कुंचा. –वि. सुंदर.
**सुहबत**–स्त्री. सोबत.
**सुहबती**–पु. सोबती.
**सुहराना**–क्रि. स. पाहा 'सहलाना'.
**सुहा**–पु. एक पक्षी.
**सुहाई**–स्त्री. शोभा.
**सुहाग**–पु. सौभाग्य, वराचा पोषाख, वरपक्षाकडील स्त्रिया विवाहाच्यावेळीं गातात तें मंगलगीत.
**सुहाग उतरना**– वैधव्य येणें.
**सुहागन**–सौभाग्यवती.
**सुहागा**–पु. टांकणखार.
**सुहागिन–नी**–स्त्री. सौभाग्यवती.
**सुहागिल**–स्त्री. सौभाग्यवती.
**सुहाता**–वि. सहन करण्याजोगें.
**सुहाया**–क्रि. अ. शोभणें, चांगलें वाटणें.–
**सुहाना**–वि. सुंदर, सुशोभित. [वि. सुंदर.
**सुहारी**–स्त्री. पुरी.
**सुहाल**–पु. तिखटामिठाची पुरी.
**सुहाव**–वि. सुंदर.
**सुहावन–ना–ला**–वि. शोभिवंत.
**सुहावा**–वि. आवडता, सुंदर, प्रिय.
**सुहावनी**– वि. सुंदर स्त्री, शोभिवंत वस्तु.
**सुहास–सी**–वि. हसतमुख.
**सुहेल**–वि. सुंदर, शोभिवंत.

**सुहेलरा**–वि. सुंदर, सुखदायक.–पु. मंगल-गीत, स्तुति.
**सुहेला**–वि. पाहा 'सुहेलरा'.
**सुहृत–द**–पु. मित्र.
**सूंगरा**–पु. रेडा.
**सूँघना**–क्रि. स. वास घेणें, कमी खाणें, साप चावणें.
**(सिर) सूँघना**–प्रेमासें मस्तक हुंगणें.
**सूँघनी**–स्त्री. तपकीर.
**सूँघा**–पु. वास घेऊन जमिनींतील पाण्याचा पत्ता लावणारा मनुष्य, जासूद.
**सूँट**–स्त्री. मौन.
**सूँड**– स्त्री. सोंड.
**सूँडी**–स्त्री. अळी, एक किडा.
**सूँस**–स्त्री. सुसर.
**सूँह**–समोर, पुढें.
**सू**–अ. कडे.
**सूअर**–पु. डुक्कर.
**सूआ**–पु. पोपट, दाभण.
**सूई**–स्त्री. सुई, घड्याळाचा कांटा, अंकुर.
**सूक**–पु. पोपट, शुक्रतारा.
**सूकना**–क्रि. अ. सुकणें.
**सूकर**–पु. डुक्कर.
**सूकरक्षेत**–पु. मथुरा प्रांतांतील एक प्राचीन तीर्थ, तुलसीदासाचें जन्मस्थान.
**सूका**–पु. पावली.
**सूक्ष्म**–वि. फार लहान, बारीक किंवा तलम. –पु. परमाणु, परब्रह्म, लिंग शरीर.
**सूख**–वि. सुकलेलें.
**सूखछड़ा**– पु. क्षयरोग.
**सूखना**–क्रि. अ. सुकणें.
**सूखा**–वि. सुकलेलें, कोरडें, हृदयहीन, कोरा, नुसता, उदास.–पु. दुष्काळ, नदीचा किनारा, कोरडी जमीन, तंबाखूचें सुकलेलें पान, एक प्रकारचा खोकला, मुलांचा एक रोग.
**सूखा जवाब देना**–इन्कार करणें.
**सूचक**–वि. सूचना करणारा. –पु. सुई, शिंपी, नाटककार, सूत्रधार, कुत्रा.
**सूचना**–स्त्री. सूचना, जाहीरात, छेदणें. –क्रि. अ. दाखविणें.
**सूचना पत्र**– पु. जाहिरात.
**सूचा**– स्त्री. विनंति, सूचना, सावधगिरी.
**सूचित**–वि. ज्याची सूचना दिली आहे असा.
**सूची**–पु. गुप्तहेर, चुगलखोर, दुष्ट. –स्त्री. सुई, नजर, दृष्टि, सैन्याचा एक प्रकारचा व्यूह, सूचीपत्र.
**सूचीपत्र**– पु. सूचि.
**सूच्यार्थ**– पु. व्यंगार्थ.
**सूज, सूजन**–स्त्री. सूज.
**सूजना**–क्रि. अ. सुजणें, सूज येणें.
**सूजनी**–स्त्री. भरतकाम केलेलें वस्त्र, बिछान्याची मोठी चादर.
**सूजा**–पु. दाभण.
**सूजाक**– पु. परमा (रोग).
**सूजी**–स्त्री. रवा, सुई.–पु. दरजी.
**सूझ**–स्त्री. दृष्टि, कल्पना.
**सूझना**–क्रि. अ. सुचणें, नजरेस येणें, सुट्टी मिळणें.
**सूझबूझ**–स्त्री. समज, अक्कल.
**सूटा**–पु. तोंडानें तंबाखू किंवा गांजाचा झुरका जोरानें ओढणें.
**सूत**–पु. सुतळ, दोरा, माप, ओळंबा, सारथी, भाट, पौराणिक, सुतार, सूत्रधार, सूर्य.–वि. उत्पन्न झालेला, चांगला, अर्थपूर्ण छोटें वाक्य.
**सूत धरना**–रेघ मारणें, खूण करणें.
**सूतमें सूत मिलना**–जशास तसें मिळणें.
**सूतमें सूत बैठना**–भेटणें, शेरास सव्वा शेर
**सूतकाघर**–पु. सूतिकागृह, बाळंतिणीची जागा.
**सूतन**–स्त्री. झोप.

सूतना–क्रि. अ. निजणें.
सूति–स्त्री. जन्म, प्रसव, उगम.
सूती–वि. सुताचे.–स्त्री. शिंपली.
सूत्र–पु. दोरा, यज्ञोपवित, रेषा, करगोटा, नियम, पत्ता.
सूत्रपात–पु. आरंभ, सुरवात.
सूथन–ना–स्त्री. पायजमा,
सूथनी–स्त्री. पायजमा, एक प्रकारचा कंद.
सूद–पु. लाभ, व्याज.
सूद दर सूद–चक्रवाढ व्याज.
सूदना–क्रि. स. नाश करणें.
सूदी–वि. व्याजी.
सूध–वि. सरळ, शुद्ध.
सूधना–क्रि. अ. खरें होणें, सिद्ध होणें.
सूधा–वि. सरळ.
सूधे–अ. सरळपणानें. [–वि. शून्य.
सून–पु. प्रसव, जन्म, कळी, फूल, फळ, पुत्र.
सूना–वि. शांत, निर्जन. –पु. एकांत. –स्त्री. मुलगी, कसाईखाना, हत्या.
सूनु–पु. पुत्र, धाकटा भाऊ, नातू, सूर्य.
सूप–पु. वरणाचें पाणी, पातळभाजी, बाण,
सूपच–पु. चांडाळ. [सूप.
सूपनखा–स्त्री. शूर्पणखा.
सूपा–पु. सूप.
सूफ़–पु. लोकरी कपडा, लोकर.
सूफियाना–वि. सुफी संप्रदायाशीं संबंध ठेवणारा, हकला आणि सुंदर.
सूफ़ी–पु. मुसलमानांचा एक धार्मिक उदार संप्रदाय कांबळें पांघरणारा.
सूबा–पु. प्रांत, सुभा, सुभेदार.
सूबेदार–पु. सुभेदार, सुभ्यावरील अधिकारी, फौजेंतील एका लहानशा अधिकाऱ्याचा हुद्दा.

सूभर–वि. सुंदर, दिव्य, स्वच्छ.
सूम–वि. कृपण, कवडीचुंबक.
सूर–पु. सूरदास, डुक्कर, आनंद, काळसर लालरंग, कर्णा. –वि. शूर.
सूरज–पु. सूर्य.
सूरज पर थूकना या धूल फेंकना–निर्दोष व पवित्र माणसाला दोष लावणें.
सूरजको दीपक दिखाना–जो स्वतः शहाणा आहे त्याला शिकविणें.
सूरजतनी–स्त्री. यमुना.
सूरजमुखी–पु. पिवळ्या फुलांचें झाड.
सूरत–स्त्री. चेहरा, उपाय, दशा, शोभा, स्मरण. –वि. अनुकूल.
सूरत दिखाना–तोंड दाखविणें.
सूरत बनाना–वेश बदलणें, नाक मुरडणें.
सूरत बिगड़ना–निस्तेज होणें.
सूरतदार–वि. सुंदर.
सूरतन्–अ. बाहेरून.
सूरतपरस्त–वि. सौंदर्यपूजक, मूर्तिपूजक, केवळ रूपाची उपासना करणारा.
सूरत हराम–वि. फक्त बाह्य देखावा चांगला असलेला.
सूरता, सूरताई–स्त्री. पराक्रम.
सूरन–पु. सुरण.
सूरमा-माँ–पु. वीर.
सूरसावंत–पु. युद्धमंत्री, नायक.
सूरा–पु. कुराणाचा अध्याय.
सूराख़–पु. छिद्र.
सूल–पु. शूळ.
सूलना–क्रि. स. पीडित करणें, भाल्यानें मारणें.–क्रि. अ. व्यथित करणें.
सूली–स्त्री. सूळ.–पु. शंकर.
सूवना–क्रि. अ. वाहणें.–पु. पोपट, ब्राम्हण.

**सूस**–सुसर.
**सूसी**–स्त्री. एक कापड
**सूसुम**–वि. कोंबट.
**सूहा**–पु. एक प्रकारचा लाल रंग, एक
**सूही**–वि. तांबडें. [मिश्र राग. –वि. लाल.
**सृंग**–पु. शूळ, भाला, तीर, गजरा, माळ, शिंग, शिखर, कंगोरा, शिंग (बाजा), कमळ, शृंगऋषि.
**सृगाल**, **शृगाल**–पु. कोल्हा.
**सृजन**–पु. रचना, उत्पादन, सृष्टीची [उत्पत्ति.
**सेंक**–स्त्री. शेक.
**सेंकना**–क्रि. स. शेकणें, भाजणें.
**(आंख) सेंकना**–सौंदर्य पाहणें, डोळयाचें पारणें फिटणें.
**(धूप) सेंकना**–उन्हांत बसणें.
**सेंगर**–पु. शेंगाचें एक झाड ( भाजी करतात ), मार्गशीर्ष महिन्यांत येणारें भाताचें पीक, क्षत्रियांची एक जात.
**सेंट**–स्त्री. सुगंध.
**सेंटना**–क्रि. अ. सुगंध येणें
**सेंठा**–पु. शेणी.
**सेंत**–स्त्री. फुकट.
**सेंतका, सेंतमें**–फुकटचें, रासच्या रास.
**सेंतना**–क्रि. स. ताब्यांत ठेवणें, एकत्र करणें, संभाळून ठेवणें, हातानें जमा करणें.
**सेंतमेंत**–अ. फुकट, बिनखर्चानें.
**सेंति-ती**–स्त्री. फुकट. –प्रत्य. जुन्या हिंदीचें करण व अपादान विभक्तीचे प्रत्यय.
**सेंदुर**–पु. कुंकू.
**सेंदुर चढ़ना**–लग्न होणें (स्त्रीचें). [डबा.
**सेंदुरा**–वि. शेंदरी रंगाचा. –वि. शेंदराचा
**सेंदुरिया**–पु. लाल फुलें येणारें एक झाड. –वि. लालभडक.
**सेंदुरी**–स्त्री. लाल रंगाची गाय.
**सेंध**–स्त्री. चोरी करण्याकरितां भिंतीला पाडलेलें छिद्र.
**सेंध लगाना या मारना**–छिद्र पाडणें.
**सेंधा**–पु. सैंधव.
**सेंधिया**–वि. घर फोडून चोरी करणारा, ग्वाल्हेरचा प्रसिद्ध मराठा, राज [घराण्याची पदवी.
**सेंधी**–पु. खजुराचा रस.
**सेंधौ**–पु. सैंधव.
**सेंमर**–पु. कांटेसांवरी.
**सेंवई**–स्त्री. शेवया.
**सेंवर**–पु. कांटेसवारीचें झाड.
**सेंहुड**–पु. वई निवडुंग.
**से**–प्रत्य.–तृतीया व पंचमी विभक्ति. –वि. [सारखें. –सर्व. ते.
**सेइ**–सेवन करून.
**सेउ**–पु. सफरचंद.
**सेक**–पु. जलसिंचन, शिंपण.
**सेकड़ा**–पु. शेतकऱ्याची बैल हांकण्याची काठी किंवा चाबूक, महंमद पैगंबराच्या वंशजांची पदवी, मुसलमानी धर्माचा आचार्य. [पदवी.–पु. परमेश्वर.
**सेख, शेख**–महम्मद पैगंबराच्या वंशजांची
**सेख, शेष**–वि. शिल्लक राहिलेलें, समाप्त, शिल्लक, अध्याहृत, बाकी.–पु. शेषनाग, लक्ष्मण, बलराम.
**सेगा**–पु. विभाग, विषय.
**सेज**–स्त्री. शय्या, पलंग.
**सेजरिया**–स्त्री. शय्या, पलंग.
**सेझदाद्रि**–पु. सह्याद्रि.
**सेझना**–क्रि. अ. दूर होणें.
**सेटना**–क्रि. स. सजणें, महत्त्व कबूल करणें.
**सेठ**–पु. शेट, मोठा व्यापारी, श्रीमंत माणूस, सोनार.

सेठानी–स्त्री. सावकाराची बायको.
सेढ़ा–पु. शेंबूड.
सेत–वि. पांढरा, निर्दोष, गोरा.–पु. पांढरा रंग, चांदी, पुराणांतील एक द्वीप, शिवाचा एक अवतार, बांध, पूल, सीमा, मर्यादा, ओंकार, व्याख्या.
सेतकुली–वि. पांढरा नाग.
सेतद्युति–पु. चंद्र.
सेतिका–स्त्री. अयोध्या. [ओंकार, व्याख्या.
सेतु–पु. बांध, बंधन, पूल, सेतु, मर्यादा,
सेतुक–अ. समोर.–पु. लहान पूल.
सेतुवा–पु. सुसर.
सेथिवा–पु. नेत्र वैद्य.
सेद, श्वेद–पु. घाम.
सेन–पु. शरीर, जीवन, बाजपक्षी, एक भक्त न्हावी. स्त्री.–सैन्य.
सेना–स्त्री. सैन्य, भाला, इंद्राचें वज्र, इंद्राणी.–क्रि.स. सेवा करणें, आराधना करणें, नियमानें वागणें, निरंतर वास करणें, दूर न करणें, मादीचें अंडीं
सेनानी–पु. कार्तिकेय, सेनापति. [उबविणें.
सेनावास–पु. तंबू, सैन्याची छावणी.
सेनि–स्त्री. श्रेणी, ओळ.
सेनी–स्त्री. मोठी बशी, जिना, ओळ, ससा-
सेब–पु. सफरचंद. [ण्याची मादी.
सेम–स्त्री. वालपापडीच्या शेंगा.
सेमई–स्त्री. शेवया.
सेमर–पु. दलदलीची जमीन.
सेमल–पु. सावरीचें झाड.
सेमूर–ल–पु. कांटेसांवरी.
सेर–पु. शेर (प्रमाण), एक प्रकारचा भात, सिंह.–वि. तृप्त.
सेरवा–पु. खाटेचें लहान लाकूड.
सेरा–पु. खाटेची डोक्याच्या बाजूची फळी, शिपलेली जमीन.
सेराना–क्रि. अ. थंड होणें, तृप्त होणें, जिवंत न राहणें, संपणें, ठरणें.–क्रि. स. थंड करणें, मूर्तीचें विसर्जन करणें.
सेराब–वि. शिपलेली, पाण्यानें भरलेली.
सेरी–पु. रस्ता.–स्त्री. तृप्ति.
सेल–पु. भाला.–स्त्री. माळ.
सेलखडी–स्त्री. खडू.
सेलना–क्रि. अ. मरणें.
सेला–पु. शेला.
सेली–स्त्री. लहान भाला, ओढणी, बैराग्याची माळ, स्त्रियांचा एक दागिना, उपरणें.
सेल्ला–पु. भाला, बरची, शेला, शल्य.
सेल्ह–पु. भाला.–स्त्री. माळ.
सेल्हा–पु. शेला.
सेवॅर–पु. सावरीचें झाड.
सेव–पु. शेव, सफरचंद.–स्त्री. सेवा.
सेवई–स्त्री. शेवया.
सेवक–पु. चाकर, भक्त, उपयोगांत आणणारा, सोडून न जाणारा, शिंपी.
सेवकाई–स्त्री. सेवा, चाकरी.
सेवड़ा–पु. शेवई, जैन साधूंचा एक भेद.
सेवती–स्त्री. पांढरा गुलाब.
सेवन–पु. परिचर्या, उपासना, प्रयोग, वास
सेवनी–स्त्री. दासी. [(राहणें), उपभोग.
सेवर–पु. एक जंगली जात.
सेवरा–पु. पाहा 'सेवड़ा'.
सेवरी–स्त्री. शबरी.
सेवा–स्त्री. परिचर्या, सेवा, नोकरी, आराधना, उपासना, आश्रय, आधार, रक्षण, संभोग.

**सेवाटहल**—स्त्री. सेवाचाकरी.
**सेवाधारी**—पु. पुजारी.
**सेवाबंदगी**—स्त्री. पूजापाठ, आराधना.
**सेवाती**—स्त्री. शेवंती, स्वाति.
**सेवार-ल**—स्त्री. शेवाळ.
**सेब**—पु. पाहा, ' सेख. '' [बाजी.
**सेसर**—पु. पत्त्यांचा एक खेळ, जाळें, दगा-
**सेसरिया**—पु. जाळ्यांत फसविणारा,
**सेह**—वि. तीन. [कपटी.
**सेहत**—स्त्री. आरोग्य, सुख, रोगमुक्ति.
**सेहतखाना**—पु. संडास.
**सेहत नामा**—पु. शुद्धिपत्र, आरोग्यसूचक
**सेहमाही**—वि. त्रैमासिक. [प्रमाणपत्र.
**सेहर**—पु. जादू, इंद्रजाल.
**सेहरा**—पु. मुंडावळ, विवाहाच्या प्रसंगीं गावयाचीं गाणीं, विवाहप्रसंगीं घालावयाची पगडी. [कृतार्थ होणें.
**(किसीके सिर) सेहरा बाँधना**—एकाद्याचें
**(किसीके सिर) सेहरा होना**—कार्यसिद्धीचा भार त्याच्यावर असणें.
**सेहशंबा**—पु. मंगळवार.
**सेही**—स्त्री. साळू ( प्राणी ).
**सेहुँआँ**—पु. आंगावर चट्टे पडण्याचा रोग.
**सैंतना**—क्रि. स. एकत्र करणें, जमविणें, सांभाळून ठेवणें.
**सैंतालीस**—वि. सत्तेचाळीस.
**सैंतीस**—वि. सदतीस.
**सैंधव**—पु. सैंधव मीठ, सिंध देशचा घोडा, सिंधी.—वि. सिंध देशचा, समुद्रासंबंधीं.
**सैंवर**—पु. सैंधव, सांभर सरोवर, सांबर, प्रवासांतील शिदोरी.
**सैंह**—अ. पुढें, समोर.—स्त्री. शपथ.
**सै**-वि.—शंभर.—स्त्री.तत्त्व, शक्ति भरभराट.

**सैकड़ा**—पु. शेंकडा.
**सैकड़े**—अ. प्रतिशंभर.
**सैकड़ों**—वि. शेकडों, बहुसंख्य.
**सैकत**—वि. रेताड, वाळूचें बनलेलें.
**सैक़ल**—पु. हत्याराला धार लावण्याचें काम.
**सैक़लगर, सकलीगर**—पु. हत्याराला धार
**सैग**—स्त्री. बरोबरी, पूर्णता. [लावणारा.
**सैगर**—वि. फार, पुष्कळ.
**सैथी**—स्त्री. बरची.
**सैद**—पु. सय्यद. शिकार.
**सैदानी**—स्त्री. सैय्यद स्त्री. [शयन, श्येन.
**सैन**—स्त्री. इशारा, सैन्य, चिन्ह—पु. शय्या,
**सैनभोग**—पु. देवापुढे ठेवावयाचा रात्रीचा
**सैना**—स्त्री. सेना.—पु. खण, इषारा. [नैवेद्य.
**सैनिक**—पु. सैन्यांतील शिपाई, पहारेकरी. —वि. सैन्यासंबधीं.
**सैनी**—पु. न्हावी.—स्त्री. सैन्य.
**सैफ़**—स्त्री. तलवार, खड्ग.
**सैफ़ज़बाँ**—वि. प्रभावी भाषण करणारा, फटकळ तोंडाचा.
**सैयाँ**—पु. पति, मालिक, प्रिय. [एक वर्ग.
**सैयद**—पु. मुसलमानांच्या चार वर्गांपैकीं
**सैया, शैया**—स्त्री. शय्या, बिछाना.
**सैयाद**—पु. शिकारी, कवितेंतील प्रेमी किंवा प्रेमिकेकरितां येणारा शब्द.
**सैयार**—पु. खूप प्रवास करणारा.
**सैयारा**—पु. नक्षत्र.
**सैयाल**—वि. प्रवाही.
**सैयाह**—वि. प्रवासी.
**सैयाही**—स्त्री. प्रवास.
**सैय्या**—स्त्री. शय्या, पलंग.
**सैर**—स्त्री. सहल, आनंद, मौजेनें करावयाचा प्रवास, मनोरंजक प्रवास.

**सैरगाह**–स्त्री. फिरावयास जाण्याचें ठिकाण, सुंदरस्थान.
**सैल**–स्त्री. पूर, प्रवाह, सहल.–पु. पर्वत.
**सैलजा**–स्त्री. पार्वती, दुर्गा.
**सैलराज, शैलराज**–पु. हिमालय.
**सैलानी**–वि. प्रवास करणारा, आनंदी.
**सैलाब**–पु. पूर.
**सैलाबची**–वि. विलीम.
**सैलाबी**–स्त्री. पुरामुळें भिजणारी जमीन. –वि. पुरांत बुडून जाणारें.
**सैलूख–ष**–पु. नट, धूर्त.
**सैवाल**–पु. शेवाळ.
**सों**–प्रत्य.– करण व आपादान कारकाचा प्रत्यय.–वि. सारखा.–अ. सहित, समोर. –सर्व. तो.–स्त्री. शपथ.
**सोंच**–पु. विचार, मनन.
**सोंचर नमक**–पु. काळें मीठ.
**सोंट बरदार**–पु. भालदार, चोपदार.
**सोंटा**–पु. सोटा, भांग घोटण्याचा दांडा, [ काठी.
**सोंठ**–स्त्री. सुंठ.
**सोंठे करना**–खूप बडविणें. [लाडू.
**सोंठौरा**–पु. बाळंतिणीकरितां केलेले सुंठीचे
**सोंध**–अ. समोर.–स्त्री. शपथ.-वि. सुगंधित.
**सोंधना**–क्रि. अ. मातीचा वास दरवळणें.
**सोंधा**–वि. सुवासिक, भाजलेल्या मातीच्या वासासारखा.–स्त्री. मातीचा वास.–पु.
**सोंधी सुगंध**–खमंग वास. [गव्हला कचरा.
**सोंह–ही**–स्त्री. शपथ.–अ. समोर.
**सो**–सर्व. तो.–वि. सारखा.–अ. याकरितां.
**सोअना**–क्रि. अ. निजणें.
**सोआ**–पु. शेपूची भाजी.
**सोई**–स. तोच.–अ. याकरितां.
**सोऊ**–अ. तोसुद्धां.
**सोक,शोक**–पु. दुःख, शोक.
**सोख, शोख**–वि. धीट, चंचल. चमकदार रंग.
**सोख़्ता**–वि. दग्ध, जळलेला, दुःखी.–पु. टिपकागद.
**सोखन**–पु. एक प्रकारचा जंगली तांदुळ.
**सोखना**–क्रि. स. शोषणें.
**सोख़्तनी**–स्त्री. जळाऊ लाकूड, किंवा पदार्थ.
**सोख़्ता**–पु. टिपकागद.–वि. दग्ध, दुःखी.
**सोग**–पु. शोक.
**सोगी**–वि. शोकाकुल, दुःखी.
**सोच**–पु. विचार, चिंता, शोक, पश्चात्ताप.
**सोचना**– क्रि. अ. विचार करणें, चिंता करणें, खेद करणें.
**सोचनीय**–वि. दुःखदायक, अत्यंत हीन.
**सोचविचार**–पु. समजूत, पूर्ण विचार.
**सोज़**–पु. दुःख, दाह, पद्यविशेष.
**सोज**–स्त्री. सूज, उपकरण, शैया.
**सोज़न**–स्त्री. सुई.
**सोजनकारी**–स्त्री. सुईचें काम.
**सोजिश**–स्त्री. सूज.
**सोझ–झा**–वि. सरळ, समोर गेलेला.
**सोटा**–पु. पोपट, काठी.
**सोढ़र**–वि. भोंदू, मूर्ख.
**सोत–ता**–पु. स्रोत, झरा.
**सोति–ती**–स्त्री. स्रोत, स्वाती नक्षत्र.– पु. वेदांत पारंगत, ब्राह्मणांतील एक भेद.
**सोध**–पु. शोध, तपास, सुधारणा, परत फेड, महाल.
**सोधना**–क्रि. स. शुद्ध करणें, साफ करणें, दुरुस्त करणें, निश्चित करणें, धुंडाळणें, चुकते करणें ( ऋण ). [ –वि. लाल.
**सोन**– पु. शोणनद, सोनें, एक जल पक्षी.
**सोनकीकर**–पु. एक फार मोठा वृक्ष.

**सोनकेला**—पु. सोनकेळें.
**सोनजरद, सोनजूहि—ही**—स्त्री. पिवळी जुई.
**सोनवाना, सोनहरा—ला**— वि. सोनेरी.
**सोनहा**—पु. कुत्र्याच्या जातीचा एक लहान जंगली प्राणी.
**सोना**—पु. सोनें, सुंदर वस्तु, राजहंस.—क्रि. अ. निजणें. —स्त्री. एक मासा. [ होणें.
**सोने का घर मिट्टी होना**—सर्व कांहीं नष्ट
**सोनेमें घुन लगना**—असंभव गोष्ट होणें.
**सोनेमें सुगंध**—फार चांगल्या गोष्टींत आणखी विशेषता असणें.
**सोनापाठा**—पु. एक औषधी झाड. [मक्षिका.
**सोनामक्खी**—स्त्री. एक उपधातु, सुवर्ण
**सोनित**—वि. लाल रंगाचा.—पु. रक्त.
**सोनिप**—पु. राजा.
**सोनी**—पु. सोनार.
**सोपत**—पु. आरामाची व्यवस्था.
**सोपता**—पु. एकांत स्थान.
**सोपान**—पु. शिडी, जिना.
**सोपि**—वि. तोच, तोसुद्धां. [ होणें.
**सोफ़ता**—पु. एकांत, फ़ुरसत, रोग कमी
**सोफियाना**—वि. साधें व सुंदर, सूफीसंबंधीं.
**सोफी**—पु. सूफी.
**सोभ**—स्त्री. शोभा, चमक, छटा, सजावट, रंग, वीस अक्षरांचें एक वर्णवृत्त.
**सोभना**—क्रि. अ. शोभणें.—स्त्री. सुंदर स्त्री,
**सोभा**—स्त्री. पाहा 'सोभ.' [ हळद.
**सोम**—पु. सोमरसाची वेल, वैदिक कालांतील एक देव, सोमवार, कुबेर, यम, वायु, अमृत, जल, सोमयज्ञ, स्वर्ग.
**सोमकर**—पु. चंद्राचे किरण.
**सोमवारी**—स्त्री. सोमवती अमावास्या.—वि. सोमवारसंबंधीं.
**सोय**—सर्व, तेंच.—अ. याकरितां.
**सोया**—पु. शेपूची भाजी.— क्रि. अ. झोपला.
**सोर**—पु. कोलाहल, प्रसिद्धि.—स्त्री. मूळ.
**सोरठा**—पु. अठ्ठेचाळीस मात्रांचा एक छंद.
**सोरनी**—स्त्री. झाडू, मृतकाचा एक संस्कार.
**सोरबा**—पु. रसा.
**सोरही**—स्त्री. सोळा कवड्यांनीं खेळण्याचा जुगार, जुगाराच्या सोळा कवड्या.
**सोरा**—पु. सोडा ( क्षार ).
**सोरह, सोलह**—वि. सोळा.
**सोलह आने पाव रत्ती**—सव्वा सोळा आणे
**सोलहो आने**—संपूर्ण. [ (यश).
**सोला**—पु. एक प्रकारचें झाड ( यांच्या फांद्यांच्या सालीपासून इंग्रज लोकांच्या टोप्या बनतात ).
**सोवना**—पु. सोनें, फार सुंदर वस्तु, राजहंस, एक मध्यम उंचीचा वृक्ष.—स्त्री. एक प्रकारचा मासा.—क्रि. अ. झोंप घेणें,
**सोवा**—पु. शेपूची भाजी. [ अंग सुन्न होणें.
**सो (शो) षक**—पु. शोषण करणारा, सुकविणारा, क्षीण करणारा.
**सोसन**—पु. इराणांतील एक प्रसिद्ध फुलझाड.
**सोसनी**—वि. तांबूस निळा.
**सोसि**—अ. असा असेल, तो तू आहेस.
**सोसु**—त्याचा, त्याचाच.
**सोह**—अ. समोर. —स्त्री. शपथ.
**सोहगी**—स्त्री. वाङनिश्चयानंतर वधूला द्यावयाचे कपडे, दागिने, इ. वस्तु, सौभाग्यचिन्ह ( कुंकूं, शेंदूर ).
**सोहन**—वि. सुंदर.—पु. सुंदर पुरुष.—स्त्री. एक प्रकारचा मोठा पक्षी.
**सोहन पपड़ी**—स्त्री. एक प्रकारची मिठाई.
**सोहन हलवा**—पु. एक प्रकारची स्वादिष्ट

मिठाई. [ सुंदर.
**सोहना**–क्रि. अ. आवडणें, शोभणें.– वि.
**सोहबत**–स्त्री. सोबत, संभोग.
**सोहबतयाफ्ता**–वि. चांगल्या लोकांच्या सहवासांत राहिलेला, सुशिक्षित.
**सोहबती**–पु. सोबती.
**सोहमस्मि**–सोऽहम्, तो मी आहे.
**सोहर**–स्त्री. सूतिकागृह.–पु. मंगल गीत.
**सोहरत**–स्त्री. कीर्ति.
**सोहरना**–क्रि. स. गोंजारणें.
**सोहराना**–क्रि. स. गोजारणें, हात फिरविणें, गुदगुल्या करणें.–क्रि. अ. गुदगुल्या होणें.
**सोहाइन**– वि. सुंदर.
**सोहाई**–क्रि. स. शोभविणें, सुंदर दिसणें, बेणणें.–वि. गोड, गोजिरवाणें.
**सोहाग**–पु. सौभाग्य.
**सोहागा**–पु. टांकणखार.
**सोहागिन**–स्त्री. सौभाग्यवती.
**सोहाता**–वि. सुंदर. [ सजणें.
**सोहाना**–क्रि. अ. रुचणें, गोड लागणें,
**सोहासित**–वि. प्रिय, आवडीचा, खुशामती.
**सोहिला**–पु. मंगलगीत.
**सौंधाई**–स्त्री. अधिकता.
**सौंचना**–क्रि. स. मलत्याग करणें, त्यानंतर
**सौंचर**–पु. काळें मीठ. [ हातपाय धुणें.
**सौंड-डा**–पु. पासोडी. [ भिजविणें.
**सौंदन**–स्त्री. धोब्याचे खाऱ्या मातींत कपडे
**सौंदना**–क्रि. स. मिसळणें, एकजीव करणें.
**सौंदर्य**–पु. सुंदरता, सौंदर्य. [पांढरा दगड.
**सौंध**–स्त्री. सुगंध सुवास.–पु. प्रासाद, चांदी,
**सौंधना**–क्रि. स. सुगंधित करणें.
**सौंधा**–वि. स्वादिष्ट, रुचकर.
**सौंधाई**–स्त्री. स्वादिष्टपणा, सुगंध, सुवास.
**सौंपना**–क्रि. स. सोपणें, सांगून सवरून
**सौंफ**–स्त्री. बडिशेप. [ हवाली करणें
**सौंरई**–स्त्री. सावळेपणा.
**सौंरना**–क्रि. अ. स्मरण करणें.
**सौंह**–स्त्री. शपथ.–अ. समोर.
**सौ**–वि. शंभर.–अ. समान.
**सौ बातकी एक बात**–सारांश.
**सौक, सौकन**–स्त्री. सवत.–वि. एकशें.
**सौख, शौक**–पु. शौक.
**सौगंद**–स्त्री. शपथ.
**सौगंध**–पु. गंधी, सुगंध. –स्त्री. शपथ.
**सौग़ात**–स्त्री. भेट.
**सौग़ाती**–वि. उत्तम, भेट देण्यास योग्य.
**सौघा**–वि स्वस्त.
**सौच, शौच**–पु. शुद्धता, पवित्रता.
**सौज**–स्त्री. सामुग्री, शय्या.
**सौजना**– क्रि. स. नटणें, शृंगारणें, सजणें.
**सौजा**–पु. शिकार.
**सौत, सौतन, सौतिन**–स्त्री. सवत.
**सौतिया डाह**–स्त्री. सापत्नभाव.
**सौतुक, सौतुख**–अ. समोर, जागेपणीं.
**सौतेला**–वि. सावत्र.
**सौदा**–पु. व्यापार, व्यापाराच्या वस्तु,
**सौदाई**–वि. वेडा. [वेडेपणा, प्रेम, ध्यास.
**सौदागर**–पु. व्यापारी.
**सौदागरी**–स्त्री. व्यापार, व्यवसाय.
**सौदाम(मि)नी**–स्त्री. वीज, विद्युत्.
**सौदा सुलुफ़**–पु. व्यापारी वस्तु.
**सौदा सूत**–पु. व्यवहार.
**सौध**–पु. महाल, चांदी, पांढरा दगड.
**सौधना**–क्रि. स. साधणें, नेम मारणें, मोजणें, संचय करणें, थांबविणें, हांकणें, शुद्ध करणें, दोष दूर करणें,

निर्णय करणें, शोधणें, दुरुस्त करणें, कर्ज फेडणें.
**सौन**—अ. समोर, पुढें.—पु. कसाई. [सौंदर्य.
**सौभग**—पु. सद्भाग्य, सुख, धनदौलत,
**सौभाग्य**—पु. सुदैव, सुख, आनंद, क्षेम, कुशल, सौभाग्य, सौंदर्य, ऐश्वर्य, वैभव.
**सौभाग्यवती**—स्त्री. सधवा, सौभाग्यवती.
**सौभागिनी**—स्त्री. सौभाग्यवती.
**सौमनस्य**—पु. प्रसन्नता. [शत्रुघ्न.
**सौमित्री**—स्त्री. सुमित्राचे पुत्र लक्ष्मण व
**सौम्य**—वि. सोमलतासंबंधी, चंद्रमासंबंधी, शीतल आणि स्निग्ध, सुशील, शुभ, मनोहर.—पु. सोमयज्ञ, बुध, ब्राह्मण, मार्गशीर्ष, सज्जनता, एक दिव्यास्त्र.
**सौर**—वि. सूर्यासंबंधीं, सूर्यापासून उत्पन्न झालेलें.-पु.शनि, सूर्याचा उपासक.-स्त्री.
**सौरज**—पु. शौर्य. [चादर.
**सौरभ**—पु. सुगंध, केशर, आंबा.
**सौरि,शौरि**—पु. श्रीकृष्ण, वासुदेव, शनिग्रह.
**सौरी**—स्त्री. प्रसूतिघर, एक प्रकारचा मासा.
**सौवर्चल**—पु. संचलखार.
**सौष्ठव**—पु. सौंदर्य, अवयवांचा रेखीवपणा, सौष्ठव, नाटकांचे एक अंग.
**सौहं**—स्त्री. शपथ.—अ. पुढें, समोर.
**सौहार्द-र्द्य**—पु. मैत्री, मित्रता.
**सौहों**—अ. समोर, पुढें.
**सौहृद**—पु. मित्रता, मित्र.
**स्तंभ**—पु. खांब, खोड, अचलता, प्रतिबंध.
**स्तंभित**—वि. निःस्तब्ध, सुन्न, थांबलेला.
**स्तन**—पु. स्तन.
**स्तनपायी**—वि. अंगावर दूध पिणारें मूल.
**स्तबक**—पु. फुलांचा गुच्छ, समूह, राशी, पुस्तकाचा अध्याय किंवा परिच्छेद,
**स्तीर्ण**—वि. पसरलेला. [स्तुति करणारा.
**स्तुत**—वि. प्रशंसित.
**स्तुति**—स्त्री. प्रशंसा, तारीफ, बढाई,
**स्तोक**—पु. बुंद, बिंदु, चातक. [दुर्गा.
**स्तोत्र**—पु. स्तुति.
**स्त्री**—स्त्री. नारी, पत्नी, मादी, वर्णवृत्त.
**स्त्रीव्रत**—पु. पत्नीव्रत, अव्यभिचार.
**स्थकित**—वि. थकलेला.
**स्थगित**—वि. तहकूब, झांकलेला, थोड्या वेळापुरता थांबविलेला.
**स्थल**—पु. जमीन, स्थान, निर्जल व रेताड जमीन, कर, संधि.
**स्थविर**—पु. वृद्ध किंवा म्हातारा मनुष्य, ब्रह्मदेव, बौद्ध भिक्षु. [णारा, टिकाऊ.
**स्थाई**—वि. थांबणारा, पुष्कळ दिवस चाल-
**स्थान**—पु. जमीन, स्थळ, ठिकाण, पद, हुद्दा, मंदिर, संधि, अवसर, स्थिति, घर.
**स्थानापन्न**— वि. दुसऱ्याच्या जागेवर तात्पुरता नेमला गेलेला, बदली.
**स्थानीय**—वि. स्थानिक. [जमविणें.
**स्थापना**—स्त्री. स्थापणें, सिद्ध करणें,
**स्थायी**—वि. स्थिर राहणारा, टिकाऊ.
**स्थायी समिति**—स्त्री. स्टँडिंग कमिटी.
**स्थावर**—वि. स्थिर, अचल.—पु. पर्वत, अचल संपत्ति.
**स्थित**—वि. अवलंबित, बसलेला, आपल्या प्रतिज्ञेवर दृढ असलेला, विद्यमान, निवासी, उभा, बरचा. [होण्यासारखें.
**स्थूल**—वि. लठ्ठ, ढोबळ.—पु. इंद्रियगोचर
**स्नातक**—पु. ब्रम्हचर्याश्रमांतून गृहस्थाश्र-

मांत प्रवेश केलेला. [तेल.
**स्नेह**–पु. प्रेम, तेलकट, पदार्थ, कोमलता,
**स्पर्श**–पु. दोन वस्तुंचा कांहीं भाग एकमेकांस लागणें, दाबाचें ज्ञान होण्याचा त्वचेचा गुण, ग्रहणामध्यें चंद्रसूर्यावर सावली पडण्याचा आरंभ.
**स्पर्शास्पर्श**–पु. शिवाशिव.
**स्पर्शी**–वि. स्पर्श करणार.
**स्पष्ट**–वि. स्पष्ट दिसणारा किंवा समजणारा, व्याकरणांत वर्णाच्या उच्चाराचा एक प्रकार (यांत ओठांचा एकमेकाला किंचित स्पर्श होतो).
**स्पष्टतया**–अ. स्पष्ट रीतीनें, उघड.
**स्पृही**–वि. इच्छा करणार.
**स्फुट**–वि. दृश्य, व्यक्त झालेलें, स्पष्ट, विकसित, किरकोळ.[केलेला, हसतमुख.
**स्फुटित**–वि. विकसित, उमललेला, स्पष्ट
**स्फूर्ति**–स्त्री. स्फुरण पावणें, उत्साह, चपलता.
**स्फोट**–पु. फुटण्याची क्रिया, फोड.
**स्फोटक**–पु. फोड.
**स्मर**–पु. कामदेव, स्मृति, आठवण.
**स्मरण**–पु. आठवण, भक्तींचा एक प्रकार. एक भाषालंकार.
**स्मरना**–क्रि. स. आठवण करणें.
**स्मरामहे**–आम्ही स्मरण करतों.
**स्मृति**–स्त्री. आठवण, हिंदूंचें धर्मशास्त्र, अठराची संख्या, छंदाचा एक प्रकार.
**स्यन्दन**–पु. थेंब थेंब गळणें, चालणें, युद्धांत उपयोगी पडणारा रथ, वायु.
**स्यात**–अ. कदाचित.
**स्यानपन**–पु. शहाणपणा, चलाखी.
**स्याना**–वि. शाहाणा, वयांत आलेला, धूर्त. –पु. वृद्ध पुरुष, मांत्रिक, चिकित्सक.
**स्यापा**–पु. मेलेल्या माणसासाठीं रडणें.
**स्यापा पड़ना**–रडणें, सामसूम होणें.
**स्याम**–वि. काळसर.–पु. भारतवर्षाच्या पूर्वेकडील एक देश.
**स्यामकरन**–पु. श्यामकर्ण घोडा.
**स्यामता**–स्त्री. काळेपणा, मलीनता.
**स्यामल**–वि. काळसर.
**स्यामा**–स्त्री. राधा, एका गोपीचें नांव, एक प्रसिद्ध काळा पक्षी, सोळा वर्षांची तरुणी, काळ्या रंगाची गाय, तुळस, कोकिळा, यमुना, रात्र, स्त्री. –वि. [काळ्यारंगाची.
**स्यार**–पु. कोल्हा.
**स्यारी**–स्त्री. कोल्ही.
**स्याल**–पु. बायकोचा भाऊ.
**स्याह**–वि. काळा.–पु. घोड्याची एक जात.
**स्याहा**–पु. जमाखर्चाची वही, सारा वही.
**स्याहानवीस**–पु. सरकारी खजीन्याचा जमाखर्च लिहिणारा माणूस.
**स्याही**–स्त्री. शाई, काळेपणा.
**स्याही जाना**–तारुण्यावस्था संपणें, केस पांढरें होणें.
**स्याही दौड़ना**–तोंड काळवंडणें.
**स्याहीचूस**–टिपकागद.
**स्यों, स्यो**–अ. सह, जवळ.
**स्रंग, श्रृंग**–पु. पर्वताचें शिखर, शिंग, शिंग (वाद्य), कमळ, एक ऋषि.
**स्रक**–स्त्री. फुलांची माळ, एक वर्णवृत्त.
**स्रम, श्रम**–पु. मेहनत.
**स्रमित**–वि. श्रमित, थकलेला.
**स्रवण**–पु. प्रवाह, गर्भपात, मूत्र, घाम, कान, शास्त्रांतील गोष्टी ऐकणें, एक प्रकारची भक्ति, अंधक मुनीच्या पुत्राचें [नांव, एक नक्षत्र.
**स्राद्ध**–पु. श्राद्ध.

**स्राप**–पु. शाप.
**स्रावक, स्रावी**–वि. वाहविणारा.
**स्री**–स्त्री. श्री. लक्ष्मी, श्रेष्ठ, धन, विभूति.
**स्रुति**–स्त्री. श्रुति, कान, ऐकलेली गोष्ट, शब्द, खबर, चारांची संख्या, नांव, विद्या, अनुप्रासाचा एक भेद.
**स्रुवा**–स्त्री. होमांत तुपाची आहुति द्यावयाची लाकडी डाव.
**स्रेनी**–स्त्री. श्रेणी, ओळ, क्रम, समूह, सैन्य, कंपनी, साखळी, जिना.
**स्रेय**–वि. श्रेय, अधिक चांगलें, श्रेष्ठ, शुभ. –पु. चांगुलपणा, कल्याण, पुण्य.
**स्रोत**–पु. पाण्याचा प्रवाह, नदी.
**स्रोता**–पु. श्रोता, ऐकणारा.
**स्लेट**–पु. पाटी.
**स्व**–वि. स्वतःचा.
**स्वच्छ**–वि. साफ, पवित्र स्पष्ट. [बेधडक.
**स्वच्छंद**–वि. स्वतंत्र, निरंकुश.–अ.
**स्वजन**–पु. आपल्या परिवारांतील लोक, नातेवाईक. [बंधनरहित.
**स्वतंत्र**–वि. मुक्त, स्वेच्छाचारी, वेगळा,
**स्वतंत्रता**–स्त्री. मुक्तता, मोकळेपणा.
**स्वतोविरोधी**–पु. स्वतःच स्वतःचा विरोध
**स्वदेश**–पु. मातृभूमि. [करणारा.
**स्वन**–पु. आवाज.
**स्वनाम धन्य**–पु. सुप्रसिद्ध.
**स्वपच**–पु. चांडाळ, डोंब.
**स्वपनना**–क्रि. अ. स्वप्न पाहाणें.
**स्वबस**–वि. आपल्या ताब्यांत.
**स्वबास**–पु. आपलें घर.
**स्वभाउ**–पु. स्वभाव. [णारा प्रधान गुण.
**स्वभाव**–पु. प्रकृति, संवय, कायम अस-
**स्वभावतः**–अ. स्वाभाविक.
**स्वयं**–अ. स्वतः, आपोआप.
**स्वयंवर**–पु. स्वतःचा पति स्वतःच निव-डण्याची एक प्राचीन लग्नपद्धति.
**स्वयंसेवक**–पु. स्वतःच्या इच्छेनें विना वेतन काम करणारा मनुष्य.
**स्वर**–पु. स्वर्ग, आकाश, ध्वनि, स्वरमाधुर्य,
**स्वराज्य**–पु. आपलें राज्य. [नाकांतील वायु.
**स्वरूप**–पु. आकार, मूर्ति किंवा चित्र इत्यादि, देवांनीं धारण केलेलें रूप, देवाचें रूप धारण केलेली व्यक्ति. –वि. सुंदर.–अ. प्रमाणें.
**स्वरोद**–पु. एक तंतुवाद्य.
**स्वर्ग**–पु. स्वर्गलोक, निर्भेळ सुख.
**स्वर्गकी धार**–आकाशगंगा.
**स्वर्ग सिधारना**–देहांत होणें.
**स्वर्गवधूटी**–स्त्री. अप्सरा.
**स्वर्गस्थ**–वि. कैलासवासी.
**स्वर्गीय**–वि. स्वर्गाचें, मृत.
**स्वर्ण**–पु. सोनें, धोत्रा.
**स्वर्णकमल**–पु. लाल कमळ.
**स्वल्प**–वि. फार थोडें, क्षुल्लक, लहान.
**स्वसा**–स्त्री. बहीण.
**स्वस्थ**–वि. निरोगी, सावध.
**स्वसेव्य**–पु. आपला स्वामी.
**स्वाँग**–पु. सोंग, हुबेहुब नक्कल.
**स्वाँगना**–क्रि. स. सोंग घेणें.
**स्वाँगी**–पु. बहुरूपी (मनुष्य), नकलाकार.
**स्वांत**–पु. अंतःकरण, मन.
**स्वांसा**–पु. श्वास.
**स्वांसा साधना**–प्राणायाम करणें, होरा
**स्वाक्षरी**–स्त्री. हस्ताक्षर. [पाहणें.
**स्वागत**–पु. आदरसत्कार.
**स्वागतकारिणी सभा**–स्त्री. स्वागतसमिति.

**स्वाति**–स्त्री. पंधरावें नक्षत्र.
**स्वाद**–पु. रुचि, इच्छा.
**स्वादक**–पु. पदार्थ तयार झाल्याबरोबर [चाखून पाहाणारा.
**स्वादिष्ट**–वि. रुचकर.
**स्वादी**–वि. रसिक, चाखणारा.
**स्वादु**–पु. मधुरता, गूळ, दूध.–वि.–मधुर, गोड, चवदार, सुंदर.
**स्वाधीन**–वि. स्वतंत्र, स्वच्छंदी.–पु. समर्पण, हवाली करणें.
**स्वाधीनता**–स्त्री. स्वातंत्र्य.
**स्वाध्याय**–पु. नियमपूर्वक अध्ययन, वेदाध्ययन, वेद.
**स्वान**–पु. कुत्रा.
**स्वाभाविक**–वि. आपोआप होणारें, स्वभावसिद्ध, नैसर्गिक.
**स्वामी**–पु. मालक, घरांतील मुख्य पुरुष, पति, ईश्वर, राजा, कार्तिकेय, साधु संन्याशांची पदवी. [पतीचें नांव.
**स्वायंभुवमनु**–पु. ब्रह्माचा पुत्र, प्रथम प्रजा-
**स्वायत्त**–वि. आपल्या ताब्यांत असलेला.
**स्वारथ**–पु. स्वार्थ.–वि. सफल.
**स्वारथ चीन्हना**–आपला स्वार्थ पाहणें.
**स्वारथ लेना**–मन घालणें, स्वारस्य असणें.
**स्वारथी**–वि. स्वार्थी.
**स्वार्थता**–स्त्री. स्वार्थीपणा.
**स्वार्थपर**–वि. स्वार्थी.
**स्वास्थ्य**–पु. आरोग्य.
**स्वास्थ्यकर**–वि. आरोग्यकारक.
**स्वास**–पु. श्वास.
**स्वीकार**–पु. अंगीकार, घेणें.
**स्वीकृत**–वि. मंजूर, स्वीकार केलेला.
**स्वीकृति**–स्त्री. मंजुरी, संमति. [स्वजन.
**स्वीय, स्वै**–वि. स्वतःचा, आपला. –पु.
**स्वेच्छाचार**–पु. मनांत येईल तें करणें.
**स्वेच्छा सेवक**–पु. स्वयंसेवक.
**स्वेत**–वि. श्वेत, उज्ज्वल.
**स्वेद**–पु. घाम, वाफ, उष्णता.
**स्वैरचारी**–वि. स्वेच्छाचारी, स्वच्छंदी, [व्यभिचारी.
**स्वैरता**–स्त्री. स्वैराचार.
**स्वैरिणी**–स्त्री. व्यभिचारिणी स्त्री.

## [ह]

**हँकड़ना, हँकरना**–क्रि. अ. कुर्र्यानें बोलणें, ललकारणें. [उठविणें.
**हँकवा**–पु. वाघाच्या शिकारीकरितां रान
**हँकवाना**–क्रि. स. हांक मारविणें.
**हँकवैया**–पु. हांक मारणारा.
**हँका**–स्त्री. ललकार.
**हँकाई**–स्त्री. हांकण्याची क्रिया किंवा मजुरी.
**हँकाना**–क्रि. स. बोलाविणें, हांकणें, हांकविणें.
**हँकार**–स्त्री. हांक.
**हँकार पड़ना**– हांक मारणें, पुकारणी होणें.
**हँकारना**–क्रि. स. मोठ्यानें हांक मारणें, हुंकारणें.
**हँकारा**–पु. हांक, आमंत्रण, आव्हान.
**हँकारी**–स्त्री. बोलावणारा दूत.
**हँगाम**–पु. वेळ, समय, हंगाम, ऋतु.
**हँगामा**–पु. भांडणतंटा, गडबड, गर्दी, लढाई, दंगा, कल्लोळ.
**हंजार**–पु. मार्ग, रीत, गति.
**हंडना**–क्रि. अ. भटकणें, वस्त्र नेसलें किंवा पांघरलें जाणें, इकडे तिकडे शोधणें, स्वैर हिंडणें.
**हंडा**–पु. पाणी भरण्याचा हांडा.
**हँडिया**– स्त्री. काचेची हंडी, मातीचें भांडें.
**हँफनि**–स्त्री. दम, धाप.
**हँफनि मिटाना**–विश्रांति घेणें, आळसणें.
**हँफनी मिटना**–स्वस्थ होणें.

**हंस**—पु. हंस, सूर्य, ब्रह्म, आत्मा, जीव, विष्णु, संन्याशांचा एक भेद, प्राणवायु, घोडा, शंकर एक छंद.
**हंसक**—पु. हंसपक्षी, पायांतील जोडवें.
**हँसतमुख**—पु. हंसतमुख.
**हँसना**—क्रि. अ. हंसणें, थट्टा करणें, प्रसन्न होणें, खुश होणें.—क्रि.स. उपहास करणें.
**हँसते हँसते**—प्रसन्नतेनें, खुशीनें.
**हँसना खेलना**—आनद करणें.
**(किसीपर) हँसना**—उपहास करणें, एकाद्याची टिंगल करणें.
**(ठठाकर) हँसना**—खो खो हसणें, खिदळणें.
**(बात) हँसकर उड़ाना**—एकादी गोष्ट क्षुद्र समजून उडविणें.
**हँसकर टालना**—हसून टाळणें.
**हँसनी, हँसिनि**—स्त्री. हंसे, हास्य.
**हँसमुख**—वि. हंसतमुख. [दागिना.
**हँसली**—स्त्री. जत्रु, स्त्रियांच्या गळयांतील
**हँसाई**—स्त्री. हंसणें, निंदा, उपहास.
**हँसाना**—क्रि. स. हंसविणें.
**हँसिया**—स्त्री. विळी, कोयता.
**हंसी**—स्त्री. हंसाची मादी, बावीस अक्षरांचें एक वर्णवृत्त.
**हँसी**—स्त्री. हास्य, थट्टा, उपहास.
**हँसी उड़ाना**—उपहास करणें, टिंगल करणें.
**हँसी खुशी**—प्रसन्नता.
**हँसी खेल**—गम्मत, तुच्छ काम.
**हँसी छूटना**—हसूं येणें.
**हँसी ठठ्ठा**—विनोद, चेष्टा.
**हँसी दिल्लगी-मजाक**—विनोद, उपहास.
**हँसीमें कहना**—गमतीचें बोलणें.
**हँसीमें टालना**—हसून घालविणें.
**हँसीमें लेना**—गंमत समजणें.
**हँसी समझना**—सोपें वाटणें, मामुली गोष्ट [समजणें.
**हँसुआ**—पु. विळा.
**हँसोड़, हँसौहाँ**—वि. थट्टेखोर.
**हअना**—क्रि. स. मारणें.
**हऊँ, हौं**—सर्व. मी.
**हक़**—वि. सत्य, उचित.—पु. परमेश्वर, हक्क, [पक्ष.
**हक़ अदा करना**—कर्तव्य पाळणें.
**हक़पर रहना-होना**—खऱ्याचा आग्रह धरणें.
**हक़में**—बाजूला, विषयीं.
**हक़तलफ़ी**—स्त्री. अन्याय.
**हक़ताला**—पु. परमेश्वर.
**हक़दार**—पु. अधिकार असलेला.
**हक़नाहक़**—अ. अकारण, व्यर्थ, जबरदस्ती.
**हकबकाना**—क्रि. अ. घाबरणें.
**हकरावना**—क्रि. स. बोलविणें.
**हकला**—वि. तोतरा, हेल काढून बोलणारा, चांचरत बोलणारा.
**हकलाना**—क्रि. अ. बोलतांना अडखळणें.
**हकलाहा**—वि. तोतरा.
**हक़शफ़ा, सफ़ा**—पु. शेजाऱ्याचें घर किंवा जमीनजुमला खरेदी करण्याचा पहिला हक्क. [ग्राहक.
**हक़शिनास**—वि. न्यायी, आस्तिक, गुण-
**हक़ारत**—स्त्री. तिरस्कार. [विकता.
**हक़ीक़त**—स्त्री. तथ्य, खरी गोष्ट, वास्त-
**हक़ीक़तमें**—वास्तविकपणें, खरोखर.
**हक़ीक़त खुलना, हक़ीक़त का पता लगना**—खऱ्या गोष्टीचा पत्ता लागणें.
**हक़ीक़ी**—वि. मूळचें, स्वतःचें, खरा, सच्चा, सख्खा. [वेत्ता.
**हकीम**—पु. आचार्य, विद्वान, वैद्य, तत्व-
**हकीमी**—स्त्री. युनानी चिकित्साशास्त्र, हकीमाकडून केली जाणारी चिकित्सा, हकीमाचा पेशा.

**हक़ीयत**–स्त्री. अधिकार.
**हक़ीर**–वि. दुबळा, तुच्छ.
**हक़ूक**–पु. 'हक़' चें अ. वचन.
**हक़ूमत**–स्त्री. अधिकार, शासन, कारकीर्द.
**हक्का**–अ. परमेश्वराची शपथ.
**हक्काक**–पु. दागिन्यावर अक्षरें किंवा मोहर
**हक्का बक्का**–वि. घाबरलेला. [खोदणारा.
**हक्काबक्का रहना**–आश्चर्यचकित होणें.
**हक़िक़यत**–स्त्री. अधिकार.
**हक़्क़े तस्नीफ़**–पु. लेखकाचा आपल्या पुस्तकावरील अधिकार.
**हगना**–क्रि. अ. हगणें.
**हगास**–स्त्री. मलत्याग करण्याची इच्छा.
**हचकना**–क्रि. स. गदगदा हलविणें.
**हचका, हचकोला–रा**–पु. हिसका, धक्का.
**हचरमचर करना**–हलणें, डोलणें, आळस करणें, कांकू करणें, ढकलाढकली करणें.
**हचहचाना**–क्रि. अ. हलणें, डोलणें.
**हज**–पु. मक्केची यात्रा.
**हज़**–पु. सद्भाय, खुशी, स्वाद, मजा.
**हज़म**–पु. पचनक्रिया, पाचन.–वि. लाटलेलें,
**हजर**–पु. दगड. [पचविलेलें.
**हज़र**–पु. पथ्य, बडबड.
**हज़रत**–पु. महापुरुषाचें संबोधन, महात्मा, महाशय, दुष्ट, पाजी, निकटता, सामिप्य.
**हज़रत सलामत**–पु. बादशहाचें संबोधन,
**हज़रेअसबद**–पु. काब्याचा दगड. [श्रीमान.
**हज़ा**–स. हें.
**हजाब**–पु. पडदा, लाज. [मजुरी.
**हजामत**–स्त्री. क्षौर, क्षौरविधी करण्याची
**हजामत बनाना**–दाढी किंवा डोक्याचे केस कापणें, लुटणें, मारपीट करणें.
**हज़ार**–वि. हजार.
**हज़ार पा**–पु. घोण.–अ. पाहिजे तितकें,
**हज़ारहा**–वि. हजारों, असंख्य. [कितीतरी.
**हज़ारा**–पु. सहस्त्र दल पुष्प, कारंजें, झारी, झेंडूचें फूल, सीमा प्रांतांतील एक जात. [लेकवळा.
**हज़ारी**–पु. एक हजार शिपायांचा मुख्य,
**हज़ारी रोज़ा**–पु, मुसलमान धर्माप्रमाणें
**हज़ीमत**–स्त्री. पराजय. [एक उपवास.
**हजूम**–पु. जनसमूह, गर्दी.
**हज़ूर**–पु. राजसभा, श्रेष्ठांचें संबोधन.
**हज़ूरी**–पु. सेवक, हुजऱ्या, दरबारी, अंग-
**हजो**–स्त्री. निंदा. [रक्षक.–वि. सरकारी.
**हज्ज**–पु. मक्केची यात्रा.
**हज्जाम**–पु. न्हावी.
**हज्जामी**–स्त्री. हजामाचा पेशा.
**हज़्म**–वि. पाचक, लुबाडलेलें.–पु. पचन.
**हट(ठ)**–स्त्री. हट्ट.
**हटक** –स्त्री. अटकाव, अडथळा. [काठी
**हटकन**–गाई हांकणें, जनावरें हांकण्याची
**हटक मानना**–मर्यादा पाळणें, आज्ञा पाळणें.
**हटकना**–क्रि. स. मना करणें, गुरें वळविणें.
**हटकार**–पु. संप, माळेचें सूत.
**हटकि**–विनाकारण, बळजबरी.
**हट(ड़)ताल**–स्त्री. हरताळ.
**हटना**–क्रि.अ. सरकणें, मागें होणें, पळणें, आपल्या वचनापासून टळणें, समोरून दूर होणें, न राहणें, अंग चोरणें.
**हटवा**–पु. दुकानदार.
**हटवाई**–स्त्री. क्रयविक्रय.
**हटवाना**–क्रि. स. दूर सारविणें, लोटविणें.
**हटवार**–पु. दुकानदार.
**हटाना**–क्रि. स. सरकविणें, पळावयास
**हटिया**–स्त्री. बाजार. [लावणें, लोटणें.

**हटौति**–स्त्री. बांधा, ठेवण.
**हट्ट**–पु. बाजार, दुकान.
**हट्टाकट्टा**–वि. सशक्त.
**हट्टी**–स्त्री. दुकान.
**हठ**–पु. हट्ट, प्रतिज्ञा, बलात्कार.
**हठ पकड़ना**–हट्ट धरणें.
**हठ माँडना**–दुराग्रह धरणें, पण करणें.
**हठमें पड़ना**–हट्ट करणें.
**हठ रखना**–हट्ट धरणें.
**हठधर्म**–पु. दुराग्रह, कट्टरपणा.
**हठधर्मी**–स्त्री. दुराग्रह, दुराग्रही माणूस.
**हठना**–क्रि. अ. हट्ट करणें, प्रतिज्ञा करणें.
**हठात्**–अ. हट्टानें, बलपूर्वक, अवश्य.
**हठि**–अ. हट्ट करून, जबरदस्तीनें, आग्रह- [पूर्वक.
**हठी**–वि. हट्टी.
**हठीला**–वि. हट्टी, दुराग्रही, धैर्यवान, [दृढप्रतिज्ञ.
**हठौना**–क्रि. स. हट्ट करविणें.
**हड़**–स्त्री. हिरडा, डोरलें.
**हड़कंप**–पु. खळबळ.
**हड़कंप मचना**–खळबळ उडणें.
**हड़क**–स्त्री. वेडा कुत्रा चावल्यानंतर पाण्यासाठीं होणारी तळमळ, उत्कृष्ट इच्छा, छंद, व्याकुळता.
**हड़कना**–क्रि. अ. एकाद्या वस्तूकरितां तळमळणें, व्याकुळ होणें.
**हड़काना**–क्रि. स. हाकलून देणें, एकाद्याच्या पाठीस लावणें, सतावणें ( एकादी वस्तु देऊन ).
**हड़काया**–वि. पिसाळलेलें (कुत्रें). [पक्षी.
**हड़गिल्ला,हड़गीला**–पु. बगळ्यासारखा एक
**हड़जोड़-र**–पु. एक औषधि वेल ( हाडें [बसविणारी ).
**हड़ताल**–स्त्री. हरताळ,संप.
**हड़ना**–क्रि. अ. वजन होणें, तोल होणें.
**हड़प**–वि. गिळलेलें, लांबविलेलें, लपविलेलें. [डणें, गिळंकृत करणें
**हड़पना**–क्रि. स. गिळणें, लांबविणें, लुबा-
**हड़फूटन**–स्त्री. हाडांत होणारी पीडा.
**हड़बड़**–स्त्री. गडबड.
**हड़बड़ाना**–क्रि. अ. उताविळ होणें, आतुर होणें, गडबडीमुळें घाबरणें.–क्रि. स. एकाद्याला घाई करणें.
**हड़बड़िया**–वि. उतावीळ. [गुंडी.
**हड़बड़ी**–स्त्री. उतावळेपणा, घाई, घाबर-
**हड़हड़ाना**–क्रि. स. घाई करणें, घाबरून सोडणें.
**हड़ावर-ल**–स्त्री. अस्थिपंजर, हाडांची माळ.
**हड्डा, हड़ा**–पु. गांधिलमाशी.
**हड्डी**–स्त्री. हाड, कूळ, वंश.
**हड्डियाँ गढ़ना या तोड़ना**–खूप मारणें.
**(पुरानी) हड्डी**–जुन्या माणसांची मजबूत प्रकृति, सुदृढ म्हातारा.
**हड्डियाँ निकल आना**–अशक्त होणें.
**हड्डी चूसना**–सर्वस्व लुटणें, नागविणें.
**हत**–वि. वध केलेला, मारलेला, गमविलेला, नष्ट केलेला, ठोकर मारलेला, पीडित, गुणलेला.
**हतक**–स्त्री. बेअब्रू.
**हतकइज्जत**–स्त्री. अप्रतिष्ठा.
**हतदैव**–वि. दुर्दैवी. [मानणें.
**हतना**–क्रि. स. नाश करणें, मारणें, न
**हतभागा-गी**–वि. अभागी.
**हतभाग्य**–वि. दुर्दैवी.
**हताना, हतवाना**–क्रि. स. मारविणें.
**हताश**–वि. निराश.
**हताहत**–वि. घायाळ.
**हत्ता**–अ. येथपर्यंत कीं.

**हत्थ**–पु. हात.
**हत्था**–पु. दांडा, मूळ, केळ्यांचा घड, पाणी उपसून टाकण्याचें लांकडी पात्र.
**हत्थी**–स्त्री. मूळ, दांडा.
**हत्थे**–अ. हातीं, मार्फत.
**हत्थे चढना**–प्राप्त होणें, ताब्यांत येणें.
**हत्या**–स्त्री. खून, वध, बखेडा.
**हत्या लगना**–हत्येचें पाप लागणें.
**हत्यारा**–पु. वध करणारा, खुनी पुरुष.
**हत्यारी**–स्त्री. हत्या करणारी, खुनी स्त्री, हत्येचें पाप.
**हथ**–पु. 'हाथ, याचें संक्षिप्त रूप.
**हथउधार**–पु. हातउसनें.
**हथकंडा**–पु. हात चलाखी, हातखंडेपणा, हस्तकौशल्य, गुप्त कारवाई.
**हथकड़ी**–स्त्री. बेडी.
**हथछुट**–वि. एकदम मारणारा.
**हथनाल**–पु. हत्तीवरील तोफ.
**हथनी, हथिनी**–स्त्री. हत्तीण. [दागिना.
**हथफूल**–पु. तळहाताच्या मागें घालण्याचा
**हथफेर**–पु. प्रेमानें शरीर गोंजारणें, लुबाडणें, हातउसने पैसे.
**हथलेवा**–पु. पाणीग्रहणाची रीत (विवाह).
**हथबांस**–पु. नाव चालविण्याचें सामान (वल्हे वगैरे).
**हथबांसना**–क्रि. स. एकादी वस्तु वापरण्यास सुरवात करणें, हातीं घेणें, प्रयोग करणें, समेटून धरणें.
**हथवासहु**–क्रि. मिळून धरा.– पु. वल्हें.
**हथसार**–स्त्री. हत्तीशाळा.
**हथाहथी**–अ. हातोहात, ताबडतोब.
**हथिया**–पु. हस्त नक्षत्र.
**हथियाना**–क्रि. स. ताब्यांत घेणें, हातीं धरणें, लुबाडणें, ठकविणें.
**हथियार**–पु. हत्यार, उपकरण.
**हथियारबंद**–वि. सशस्त्र.
**हथेरी**–स्त्री. हाताचा तळवा.
**हथेली**–स्त्री. हाताचा तळवा.
**हथेली पर जान होना, हथेली पर जान लेना**–तळहातावर शिर घेणें, मृत्यूस तयार राहणें. [क्यांत येणें.
**हथेलीमें आना**–पूर्ण ताब्यांत येणें, आटो-
**हथेव**–पु. हातोडा.
**हथोरी**–स्त्री. हाताचा तळवा.
**हथौटी**–स्त्री. हातोटी, हस्तकौशल्य, एकाद्या कामांत हात घालणें.
**हथौड़ा**–पु. हातोडा.
**हथ्याना**–क्रि. स. पाहा 'हथियाना'.
**हद**–स्त्री. सीमा, परिणाम.
**हद दर्जेका**–पराकाष्ठेचा.
**हद बांधना**–मर्यादा घालणें, विक्रम करणें.
**हदे समाअत**–स्त्री. कोर्टांत दावा दाखल केल्यानंतर द्यावयाचा अवधी.
**हदे सियासत**–स्त्री. न्यायालयाच्या अधिकाराची सीमा.
**हदसे ज्यादा**–अमर्याद, पराकाष्ठेचें.
**हदफ़**–पु. लक्ष, निशाण, मार.
**हदिया**–पु. भेट, नजराणा.
**हदीस**–स्त्री. हजरत महंमदांच्या वचनांचा संग्रह.
**हदीस खींचना**–शपथ घेणें. [नांचा संग्रह.
**हदूद**–स्त्री. 'हद्दी'चें अ. वचन.
**हनना**–क्रि. स. वध करणें, आघात करणें, गुणणें, लाकडानें ठोकून वाजविणें, शस्त्र चालविणें.
**हनवाना**–क्रि. स. मारविणें, वध करविणें. आघात करविणें.

